


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# दी पा व ळी

जुलै १९६३
वर्ष १९ वें

## श्रेयनामावलि–




टे. नं ७७७६५

[redacted]

Gram ; DALALART

*संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक-श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १ रु. + रजि. पोस्ट ५० न. पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें हीं चालकांचीं अधिकृत मतें असतातच असें नाहीं.







अनुक्रमणिका

**दीपावली**

**दलाल आर्ट स्टूडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४.

टेलिफोन: ७७७६५  तारेचा पत्ता : DALALART

● **वर्गणादारांस सूचना** : दीपावळी व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु.१२–५०न. पै., द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. परदेशी वार्षिक वर्गणी रु. १६–००

● **वर्गणी** मनिऑर्डरनें यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टूडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ न. पै. वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाइकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येतें. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमीजास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिनाभरांत सामान्यतः कळविला जातो. **पोस्टेज** असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसें पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं आवाज प्रिंटर्स, मोदी चेंबर्स, फ्रेंच ब्रीज, मुंबई ४ येथें छापून, दलाल आर्ट स्टूडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.

# चोखंदळ वाचका—
# तुला त्रिवार नमस्कार असो!!!

**वाहवा!**...धन्य धन्य चोखंदळ वाचक, तुमच्या प्रेमाला सीमा नाहीं. एकंदरींत आमचा कथा अंक तुम्हांला आवडला म्हणायचा. किती हीं स्तुतिसुमनें? किती हीं विभूषणें? आम्हीं तर अगदीं गुदमरून गेलों. पण खरं सांगू? तुमचीं अशीं सूक्ष्म अभिप्राय व्यक्त करणारीं पत्रें आलीं, कीं तुमची अभिरुची आम्हांला कळतें. तुम्हांला काय हवं, काय नको याच्या संबंधीची शहानिशा होते. कोणत्या गोष्टी तुम्हांला आवडत नाहींत, कोणत्या आवडतात, गंभीर लेखांच्या बाबतींत तुमचें काय मत आहे, हें सर्व आम्हांला कळूं लागतं. आतां हेंच पाहाना—

गेल्या अंकांतल्या संपादकीय स्फुटांत आमचा उपरोध कांहींना कळला—कांहींना मुळींच कळला नाहीं. त्यांच्या समोर 'मूर्तिमंत भीति' उभी राहिली. बऱ्याच जणांची पृच्छा आली. 'संपादक, तुम्ही आतां अश्लील कथा देणार आहांत काय?' हर हर, प्रिय वाचक, कसें शक्य आहे हें? तुमच्या अभिरुचीला जें रुचणार नाहीं त्याचा पुरस्कार आम्हीं कसा करूं? दीपावली हा साहित्य व कला यांचा संगम आहे. ज्याच्यांत सौंदर्याचा आविष्कार झालेला आहे तें तें सर्व दीपावलीला प्रिय आहे. ओंगळ आणि नीतिबाह्य लेखन दीपावलीनें आतांपर्यंत दिलेलें नाहीं आणि यापुढेंहि देण्यांत येणार नाहीं. तेव्हां वाचकानें त्याबाबतींत निर्धास्त असावें.

कथा अंकांतील कथांचीं गुणानुक्रमानें छाननी करणारीं जीं पत्रें आलीं तीं जरी 'रुचि न एक सकळाची। आवडते तेंचि, दुज्याला नावडतें' अशा स्वरूपांची असली तरी वाचक हा शिष्टमान्य टीकाकाराइतकाच श्रेष्ठ टीकाकार आहे हें कळून आलें. कथा अंकांतील 'वीर्यशुल्का' ही श्री. सातव यांची कथा बहुतेक सर्वांनाच आवडली. त्याचप्रमाणें 'चंदन' ही श्री. श्रांत यांची कथा उत्तम असल्याचा सर्वांचाच अभिप्राय पडला. कुणाला 'तोल' ही कथा आवडली, तर कुणाला तिचा उगाचच फापटपसारा वाटला, कुणी गोवईकरांच्या 'जीवींत धाग्यांत' असा गुरफटून गेला कीं स्वतःच्याच आयुष्यांतील घडलेले प्रसंग तो प्रत्यक्ष वाचून पुनःप्रत्ययच जणुं अनुभवीत असल्याचा साक्षात्कार त्याला झाला.

'दीपावली'नें कोणतें धोरण ठेवावें याबाबतींत सूचना करणारीं पत्रेंहि अनेक आहेत. त्यांतील कांहीं सूचना अवश्य लक्षांत घेण्यासारख्या आहेत. अशीं पत्रें पाहिलीं कीं एक प्रकारचा हुरूप येतो. केलेल्या कष्टांचें चीज झालें असें मनाला वाटतें. जीव तोडून एखादी सुरुचीं पूर्ण गोष्ट करावी आणि वाचकांनीं त्याची दखल घेऊं नये हें मनाला लागतें. गेल्या कांहीं वर्षांत, अनेक उद्बोधक व विचार प्रवर्तक लेखमाला दीपावलींत प्रसिद्ध झाल्या. पु. भा. भाव्यांचें मनोरे, द. ग. गोडशांचीं 'पोत' लेखमाला—आत्माराम नीलकंठ यांचा 'जय नांवाचा इतिहास', जयवंत दळवी यांची 'नग आहेत नग' ही विनोदमाला इत्यादि लेखमालांनीं मराठी साहित्यांत कमी अधिक भर घातली. कांहींना वाचकांनीं बरी दाद दिली, कांहींना दुर्लक्षित केलें. आत्माराम नीलकंठांच्या लेखमालेला जी साद मिळाली ती क्रमशः यापुढें प्रसिद्ध होत राहील.

गवय्याला दाद मिळाली कीं तो दुप्पट उत्साहानें गातो. त्याच्यापाशीं असलेले नवनवोन्मेष प्रगट करायचा तो प्रयत्न करतो. तसेंच इतर क्षेत्रांतहि आहे. संपादक असो, लेखक असो कुणीहि असो. त्याला दाद मिळाली पाहिजे. मराठी माणूस हा मनसोक्त दाद देणारा माणूस आहे. चांगले चांगले कलावंत आपला प्रांत सोडून इथें महाराष्ट्रांत कायमचें वास्तव्य करून राहिलेले आहेत. म्हणूनच म्हणतों वाचक, चांगल्या कृतींना मुक्त मनानें दाद द्या.









अनुक्रमणिका




स. न. वि. वि.

जून महिन्याचा दीपावली कथा विशेषांक वाचला. इतरही दोन-तीन कथा विशेषांक वाचले. आपल्या सप्तरंगांनीं मनाची पकड अशी पकडली कीं ती संपूर्ण सप्त रंगांतून एका दमांत फिरूनच मग विसावली. वेळेचें भान राहिलें नाहीं. 'तोल'नें सुरवात झाली. सामाजिक समस्येची चालू शतकांतील परिस्थिति आणि त्याला धरूनच खटकेबाज संवाद... एका संवादांतील योग्य खुलासा वाचून दुसऱ्यावर मात झाली. या आनंदानें त्यावरील प्रश्न किंवा उत्तर वाचल्यावर तेंही मनाला पटलें...असें सारेंच विवेचन पटलें. आणि शेवट...दीर्घ विरहांत झाला. यानें एक वेगळेंच समाधान मिळालें. म्हणून दुसरा 'एकत्र गुंफुन जीवित धागे' हा रंग दिला. तर दोन्ही रंगांचें मीलन झालें. 'मी' ही त्या मींत एकरूप होऊन गेलें. शेवट वाचून दोन मिनिटें डोळे बंद केले तर 'मारवा, अजून धुमधुमतो असें वाटलें. मग मनानें तिसऱ्या रंगाकडे पाहून त्याचा ताबा घेतला. 'मी नाजूक आहे' ही जरा हंसवील, असं वाटलं पण नांवापेक्षां जरावेगळीच वाटली. 'वीर्यशुल्का' तर उल्का तुटल्यासारखी शेवट वाचून वाटली. तिचा थोडासा कळवळा आला. पण उपयोग काय...ती केव्हांच दूर...दूर... अज्ञात स्थळीं गेली होती. 'चंदन' पांचव्या रंगानें नटून आली...चंदनच्या रंगानें...मन थोडें सुखावलें... तिच्या प्रेमळ व्यक्तिमत्वानें..भारावलों. दुःखांतिकेमुळें..हास्य रंग सहावा आला. आतापर्यंत होतो, पण या कथेनें माझें अस्तित्व थोडे मला जाणवले. कारण हास्य अगदीं उतूं जाऊं लागलें आणि सातवी कथा जी 'चाहूल' अरूण बर्वे यांची ती वाचली...थोडी वेगळी वाटली. पहिल्या सहा...सामाजिक समस्येवरील...वास्तवतेला पोषक...आणि सातवी 'चाहूल...' व्यक्तिदर्शनांत घेऊन जाणारी... कल्पनारम्यतेनें भारलेली.

तुलनात्मक पाहिल्यास विशेषांकानें फार मोठें यश मिळविल्याचें दिसून आलें. कथांचा दर्जादेखील उंचावल्याची जाणीव झाली. पहिल्या दोन कथा...लयबद्ध वाटल्या. मोजके शब्द...भरपूर मासला....

आपल्या प्रयत्नाला असेंच यश येऊन 'दीपावली' भरभराटीला येवो हीच इच्छा. वाचकाचें रंजन होऊन त्यांच्या नेहमींच्याच समस्या त्यांच्यांच शब्दांत सांगितल्या..., लिहिल्या जातात...याबद्दल आजच्या आपल्या अंकांतील मनोहर तल्हार, पद्माकर गोवईकर, माधवी भिडकर. श्रान्त, वि. रा. भाटकर आणि बर्वे यांचें मनःपूर्वक अभिनंदन. जनार्दन सातव यांनीं ऐतिहासिक कथा लिहून आजच्या समाजांतील बेजबाबदार पुरूष जातीवर... लिहिलेली रूपककथा 'वीर्यशुल्का' बद्दल त्यांचेही अभिनंदन.

आपला,

**नामदेव राणे**

महसूल विभाग, सचिवालय, मुंबई—३२

स. न. वि. वि.

आपल्या 'दीपावली'चा प्रत्येक महिन्याचा अंक नियमित वाचणारा मी एक वाचक आहे. जूनचा अंक कथाविशेषांक निघणार आहे हें आपल्या मागील अंकांत वाचल्यापासून मी मोठ्या आतुरतेनें त्या अंकाची वाट पहात होतो. गाडगीळ, गोखले, भावे यांसारख्या मातब्बर लेखकांच्या लेखणीनें सदरहू अंक नटलेला असेल अशा कल्पनेनें अंक उघडला. पण नवोदित लेखकांचीं नांवें दिसलीं. पण तरीहि आनंद वाटतो कीं या सर्व नवोदितांनीं आपल्या शैलीनें वाचनीय असं लिखाण केलें आहे. आपण प्रसिद्ध केलेल्या सात कथापैकीं जनार्दन सातव ( वीर्यशुल्का ), अरुण बर्वे ( चाहूल ) व मनोहर तल्हार ( तोल ) यांच्या कथा फार आवडल्या. मी आपले व या नवोदितांचें अभिनंदन करतो. त्यांचें वाङ्मय 'दीपावली'तून नियमित वाचायला मिळो. आपला,

**शरद एस्. वळंजू**

बी. कॉम्. बी. ए. एल्एल्. बी.,

डी/e आंबेकर नगर

परेल टँक रोड, मुंबई

स. न. वि. वि.

आपल्या 'दीपावली'च्या जून मासिकांतील 'तोल' ही कथा मला विशेष आवडली कथेची धाटणी नाविन्यपूर्ण असून हिचे वैशिष्टय म्हणजे माणसाच्या जीवनाला कोणती बंधनें असावीत हें या कथेंत प्रभावीरित्या सांगितलेलें आहे. कथा वाचतांना कंटाळा मुळींच येत नाहीं इतक्या चांगल्या रीतीनें कथा रंगविली आहे.

संतांची शिकवणूक देणारी 'चंदन' ही कथा देखील मला आवडली. शिवाय 'वीर्यशुल्का' ही रहस्यमय कथा नसूनही वाचतांना ती रहस्यकथेपेक्षांही सरस वाटली. त्याबद्दल लेखकांस धन्यवाद. अशाच प्रकारच्या, आपलें कांहींतरी वैशिष्ट्य राखणाऱ्या कथा आम्हां वाचकांस वाचावयास मिळाव्या हीच अपेक्षा.

—अरविंद द्वा. जगताप. कल्याण

एका वाचकानें विचारलेलें आहे. कीं 'अश्लीलतेचें तुम्हांला वावडें आहे काय?' होय. परंतु शृंगाराचें मात्र मुळींच नाहीं. एखादी गोष्ट अतिश्रृंगारिक असूनहि सुंदर असली, कांहींतरी नवा विचार मांडणारी असली ती समाजविघातक प्रचार करणारी नसली तर ती आम्हांला अवश्य आवडते. मात्र ती ओंगळ आणि घाणेरडा प्रचार करणारी असली तर मात्र तिचा स्वीकार होणार नाहीं. कुणीहि सुबुद्ध वाचक असल्या ओंगळपणाचा धिक्कारच करील; परंतु दुर्दैवानें आपल्याकडे ज्या तऱ्हेची आवड हल्लीं वाढल्याप्रमाणांत दिसून येत आहे त्यामुळें विचारवंतांत चिंतेचें वातावरण निर्माण होणें स्वाभाविकच आहे; परंतु अशा अनेक लाटा येतात आणि विराम पावतात. जें चिरंतन आहे तें तेवढें स्थिर राहातें. मराठी वाचकाच्या रसिकतेवर आमचा प्रगाढ विश्वास आहे. गेल्या अंकांतील सप्तरंगी कथामालिकेंतील कोणती कथा आवडली याबद्दल मत कळविण्यासाठीं वाचकांना आम्हीं आवाहन केलें. त्याबद्दल त्यांनीं मनापासून दाद देऊन चिकित्सक बुद्धीनें कथांची छाननी करून ज्या तऱ्हेनें विस्तारपूर्वक पत्रें पाठविलीं तीं पाहून आम्हीं थक्कच झालों. म्हणूनच ऊर भरून म्हणावेंसे वाटतें कीं चोखंदळ वाचका तुला त्रिवार नमस्कार असो.



*जो बंगला एकेवेळीं बहरला होता—फुलला होता. तोच आज ओस पडला होता. काकांचीं स्मृतिं तेवढीं त्यांत रेंगाळत होती. कारण त्यांचं जीवन त्यांत सार्थकी लागलं होतं...पण काका गेले. तसें ...? स्वाभिमान जागा करणारी ही एक वेगळीच कथा...*

**—प्रभाकर नेरुरकर**

**पंधरावीस** वर्षें त्याचं मन द्रुतगतीनं मागें गेलं. हेंच तें शहर. एक आश्रित म्हणून त्याला या नगरींत यावं लागलं होतं. केवळ एक आश्रित म्हणून !...आणि हाच तो बंगला. या बंगल्यांत त्याच्या विद्यार्थीदेशाची कांहीं मौलिक वर्षें गेलीं होतीं. ज्या दिवशीं प्रथमच त्यानें या वास्तूंत पाऊल टाकलं तो दिवस त्याला आठवला. दूर कोंकणांतून अति दूरवर मध्यप्रदेशांतील या नगरीमध्यें त्याला ऐन बाल्यावस्थेंतच, घरदार, आईवडील, भावंडं, मित्र अन् त्याचं आवडतं निसर्गसुंदर खेडं सोडून येणें भाग पडलं होतं. चुलत्यांनीं आपल्या कोंकणांतील धाकट्या भावाला लिहिलं होतं...' तुझ्या एका मुलाला शिकविण्याची माझी इच्छा आहे. त्याला केव्हां पाठवितोस तें कळव...'

वडिलांनीं त्याची निवड केली होती. वडील आणि आपण सर्व माणसें अजून त्याच जुनाट झोपडीवजा मातीच्या घरांत रहात होतो. त्या अवाटांतील सर्वच घराचा आवाका नाहींतरी होता केवढासा ! पण हळुहळूं इतरांच्या घराला बरकत येत होती. आपलंच घर तेवढं यावं तितकं वर येत नव्हतं. वडिलांची निष्क्रियता, परावलंबित्व, दूर शहरांत राहणाऱ्या पैसेवाल्या भावांकडून येणाऱ्या पैशांची त्यांना लागलेली चटक अन् कर्तबगारी असूनहि त्यांनीं गमावलेलं आत्मिक बळ आणि कमावलेली मनस्वी दुबळी मनोवृत्ति...

म्हणूनच गांव सोडून, सख्ख्या आईवडिलांच्या आश्रयाला त्याला मुकावं लागलं.

त्याला समजूं लागलं तेव्हांपासून त्याचे वडील त्याला जवळ घेऊन चुलत्यांच्या मोठेपणाच्या गोष्टी भावविवशतेनें कथन करीत. या दरिद्री घरांत त्याचा जन्म झाला. ती खोली अजून तिथेंच होती. जिथें काळोख दाटपणें वावरत असे. आजी मग दुजोरा देई. मग त्यांच्या बालपणांतील मोठेपणाच्या कहाण्या ऐकायला मिळत.

आजी म्हणायची, ' थोरल्याला जन्मल्यापासूनच हालांतच जगावं लागलं...हाल हाल काढले माझ्या पोरानं...'

एवढं बोलून ती दीर्घ उसासा सोडी.

आजीनं दुसऱ्याचं दळण कांडण करावं. दाईपण करावं. मुलांना पोसावं. हांकेवर घरापासूनच जवळ गांवाची शाळा होती. संस्थानांतली शाळा. थोरामोठ्यांचीं पोरं शाळेंत येत. शिकत. जल्लोष सतत कानावर येऊन पडे. थोरल्याला शिकण्याची हौस. पण अंगावर धड कपडेच नसायचे. एकच फाटका ठिगळं लावलेला अंगरखा. एक तशीच जुनेर इजार. कुणा धनवंताकडून भीक मागून आणलेली. नेहमीं घरींदारीं उघड्या अंगानं दोन वितीची काष्टी लावूनच मुलांनां वावरावं लागे. एके दिवशीं आजी थोरल्याला घेऊन शाळेंत गेली त्याचं नांव घालण्यासाठीं. पांढरपेशांची सुखवस्तू पोरं त्याचं तें ध्यान पाहून फिदीफिदी हंसली. त्या पोरांच्या बापांचे मिंधे असलेल्या हेडमास्तरांनीं सुद्धां त्याच्याकडे तुच्छतेनं पाहिलं. त्यानें लंगोटीवजा इजार घातली होती. अंगरख्यानं ती झांकली होती. खाली तंगड्या दिसत होत्या. गोऱ्या तरतरीत चेहऱ्यावर भीतीची गडद कळा पसरली होती. डोक्याचा गुळगुळीत चमनगोटा करण्यांत येऊन मध्यभागीं टकल्यावर केसांचा भोवरा राखला होता. तिथून लांबलचक शेंडीचे केस उगवले होते. शेंडीची गांठ मारून ती मागें मानेवर वळवळत होती.

घाटे मास्तर तिरस्कारानं आजीला म्हणाले होते—, ' हो तुझो पोर काय शिकतलो ? व्हय

शाळेंत ?...खुंयतरी कामाक कित्याक नाथ लावलंय ?'

आजी बाणेदार स्त्री होती. दारिद्र्यानं लाचार न झालेली.

'मास्तरानु, पुढच्या तुमका कित्याक ?'

'बराच मगो तुया बोलाक शिकलंय...' घाटे मास्तर.

'तुम्ही माका सांगा...या पोराचा नांव तुमी शाळेंत घाल्तात कीं नाय तां...'

'बरां बरा...' घाटे मास्तर आतां वरमले होते... 'बसय त्याका अपरेंत...उजळणी येतां ?...पाढे येतत काय रे तुका ?' त्यांनीं थोरल्यांला विचारलं...

थोरल्यानें फटाफट उजळणी म्हणून टाकली...थोरला शाळेंत रुजूं झाला.

थोरल्यानं रिकाम्या वेळांत रानांत जावं. लांकडे गोळा करावीत. भारा बांधून डोक्यावर घ्यावा. घरीं पुरतील तेवढीं लाकडं घरीं टाकावीत. पुनः रानांत जावं. नवा भारा तयार करावा. घरंदारं फिरून तो विकावा. पुस्तकांसाठीं पैसे जमवावेत. शिमगा आला कीं राधा नाचविण्याची गांवांत झुंबड उडे. थोरला देखणा दिसे म्हणून मृदंगी, घुमटवाले, थोरल्याला राधा होण्याचा आग्रह करीत. दिवसा कांठीं एखादा रुपया, बरेचसे तांदुळ, कांहीं नारळ राधेच्या पदरीं पडत. थोरला राधा म्हणजे अगदीं हुबेहूब राधा दिसे. नाचही फार सुंदर करी. घुमट्ये घुमट पिटीत ... 'वारियानें कुंडल हाले...' गाऊं लागले कीं थोरला राधेच्या भूमिकेंत अगदीं 'डोळे मोडीत' नाचूं लागे...थोरल्याची राधा फार गाजायची आयांत. रात्र झाली कीं सारे बस्त्याव किरिस्तावाच्या गुत्त्यावर जायचे. थोरला राधेचा पोषाख उतरून, त्यांच्या हवाली करून तडक लंगोटींत घरीं यायचा. नारळ, तादुळाची मोटली पाठीला बांधून. लंगोटीच्या एका टोकाला पैसे घट्ट बांधलेले असत.

एक दिवस संस्थानचे शिक्षणाधिकारी शाळेंत आले. आप्पा म्हणून सर्वजण त्यांना ओळखीत. मोठा कडक माणूस. करडा म्हणून प्रसिद्ध...त्यांनीं वर्गावर्गांची तोंडी, परीक्षा घेतली. मग वाचन घेतलं. लिहायला घातलं... फाटक्या कपड्यांतल्या थोरल्यानें त्यांच्यावर विलक्षण छाप पाडली...'सूर्यवंशी उत्तानपाद राया' ही दिंडी त्यानें अशा गोड गळ्यावर सुरांत व समरसून म्हटली कीं आप्पा पगडी डोलवीत खुर्चीला खिळूनच राहिले.

'कोणाचा रे मुलगा तूं ?...'

'गंगाबाईचा...'

आप्पांना गांवांतील प्रतिष्ठित माणसं सारीं टाऊक होतीं.

'कोण गंगा ?...'

'ती अशीच आहे आपली एक...' घाटे मास्तर मध्येंच पडले. पुढं म्हणाले...' हा मुलगा शिमग्यांत राधेचा नाच करतो... रंग फासतो तोंडाला...लुगडं नेसतो...'

'खरं कां रे ?

'हो...मला तेवढेंच पुस्तकांसाठीं व कपड्यांसाठीं पैसे मिळतात...' आप्पांनीं गंगाबाईला बोलावून आणलं. या पोराला शिकव... मी त्याची कपड्याची आणि पुस्तकांची सोय करीन...राधा बंद कर त्याची...'

थोरल्याची राधा बंद पडली. शिक्षण चालूं राहिलं. मराठी पांच इयत्ता गांवांतील शाळेंत पहिल्या नंबराला पुऱ्या झाल्या.

'तुझं आतां किती बरं आहे ?...' वडील मग त्याला म्हणायचे... 'तुला कुठं खस्ता खाव्या लागताहेत आमच्या सारख्या...मी फार शिकलों नाहीं हें खरं. मी मिलीटरींत गेलों. पहिल्या महायुद्धांत मेसापोटेमियांत लढलों... पण तुझे चुलते खूप खूप शिकले...इंग्लंडला गेले...त्यांनीं नांव केलं. पैसा केला. दूर दूर साता कोंकणाच्या पलिकडे नशीब काढलं. त्या शहरांत त्यांचं नांव गाजतं सारखं...मध्य प्रदेशांत सर्वत्र त्यांना लोक ओळखतात... त्यांनीं बंगला बांधला...मोटार घेतली... त्यांच्यामुळें आपल्या गावाला लोक ओळखतात. मला सरकार-दरबारी मान मिळतो...

तो अजून तिथें तसाच उभा होता.

संध्या छाया केव्हांच विरल्या होत्या. बंगल्यांत दिवे पेटले होते. जिन्यांतून माणसें वर ये जा करीत होती. त्या दुमदार लोकवस्तींत अगदीं कोपऱ्यावरच वळणाला बिलगूनच तो बंगला उभा होता. समोर भव्य मैदान पसरलं होतं. गुलहौशी जोडपीं त्या मैदानावर विहरत होती. पोरांचे खेळ चालले होते. लाऊडस्पीकर कोकलत होता. बंगल्याच्या दर्शनीं







अनुक्रमणिका

भागावर कुणा खासगी विद्यापीठाची लांबलचक पाटी लोंबकळत होती. वर टेरेसच्या कठड्याच्या मधोमध बंगल्याचं तेंच जुनं नांव घटकोनी कलाकृतींत ठळकपणें कोरलेलं होतं. आपल्या आईचं नांव त्यानीं दिल होतं.

त्याच्या चुलत्यांनीं दुःख भोगलं होतं. कष्ट उपसले होते. दारिद्र्य सोसलं होतं. म्हणूनच अजून त्यांचं मन गावाकडे ओढ घेत होतं. दरिद्री भावाच्या मुलाला शिकवूं इच्छित होतं. त्याची मराठी पांचवी संपली होती. आतां इंग्रजी शाळेंत जायचं. आणि वडील चुलत्याकडे जाण्याचं बोलूं लागले. लहानपणापासून चुलत्याबद्दल खूप ऐकलं होतं. पण चुलतीचं काय ? ती तर म्हणे मोठ्या श्रीमंत कुळांतील होती. मुलाची हुशारी पाहून तिच्या वडिलांनींच त्याच्या चुलत्याला आप्पा इन्स्पेक्टरांच्या शिफारशीवरून आश्रय दिला होता. इंग्लंडला जाण्याइतकं शिक्षण दिलं होतं. मग मुलगी पण दिली होती...तिच्याकडे आश्रित म्हणून असताना तिच्या आईनं त्याना तिचीच सेवाचाकरी करायला लावलं होतं. तिचं उष्टं खाऊनच त्यांनीं दिवस काढले होते.पुण्यांत मुन्सिपाल्टीच्या दिव्याखाली बसून रात्र रात्र अभ्यास केला होता.

तिला कोंकणांतील लोकांचा तिटकारा होता. उणं दुणं बोलून ती चुलत्यांना त्याच्या दरिद्री कोंकणची, तिकडील त्यांच्या माणसांची आठवण करून देई. त्याचे वडील तिच्याकडे राहून आले होते. पण तिनं त्यांना राहाणं नकोसं केलं होतं. गड्यासारखं घरांत राबवलं होतं. लोकांपासून त्यांचं व आपलं नातं चोरून ठेवलं होतं. कर्तबगार भावाकडे रहायला असूनहि त्यांना भाऊ म्हणून वावरायची चोरी झाली होती. तीस वर्षांपूर्वी हा बंगला बांधला गेला तेव्हां घरप्रवेशाच्या समारंभासाठीं थोरल्या भावानं धाकट्या भावाला अगत्यानं बोलावलं होतं–आपल्या आईला आणावं असं त्याचं ठरलं होतं. पण चुलतीनं ठाम बजावून ठेवलं होतं ती थेरडी घरांत येऊं नये म्हणून. चुलत्यांचं अशावेळीं चुलतीपुढें कांहीं चालत नसे.

वडील त्याला म्हणाले होते...' तरी तुला तिकडे गेलं पाहिजे.'

'मी चार मैलावरच्या शाळेंत चालत जाईन.. बाबा...' तो बोलला होता.

' नको. तूं शहरांत जा. '

' पण किती दूर ?'

' तुझ्या चुलत्यांचं चरित्र डोळ्यासमोर ठेव.'

' मला चुलतीची भीति वाटते...'

' तुला शिकलं पाहिजे...'

' तुला चुलत्यासारखं कांहीं काळ सारं कांहीं सहन केलं पाहिजे...'

' शिकायचं आहे एवढंच लक्षांत ठेव.'

' दुःख भोगल्यांनंतरच सुख शोभतं.'

' ती तर तुला खाणार नाहीं...छळील फार तर...'

' शिक्षणासाठीं छळ सोस. थोडी वर्षें...'

' चुलत्यांसारखं ध्येय ठेव.'

' त्यांच्यापेक्षां मोठा हो...त्याला फार आवडशील मग तूं...' त्याच्या आईनं मग वडिलांना दुजोरा दिला होता. त्याला धीर दिला होता. म्हटलं होतं...

' तुला अगदींच असह्य झालं तर सरळ गांवीं निघून ये...'

इतकं झाल्यावर त्याला जाणं भागच होतं. प्रथम मे महिन्यांत तो वडिलांबरोबर मुंबईला आला. तिथं चुलत्यांची सर्व मंडळी, चुलती, तिचीं मुलें, गडीमाणसं हवेसाठीं आली होती. उपनगरांत एका आलिशान बंगल्यांत रहात होती. मुंबई तो प्रथमच पहात होता. श्रीमंती वैभव तर तत्पूर्वी त्यानें कधींच अनुभवलं नव्हतं.

सर्वांनीं त्याच्याकडे एक आसऱ्याला आलेला गरीब मुलगा या दृष्टीनेंच पाहिलं होतं. त्याच्या चुलत भावंडांच्या श्रीमंत मित्र–मैत्रिणी येत असत. दिवाणखान्यांत, गप्पागोष्टी, हास्यकल्लोळ, थट्टामस्करी यांना ऊत येई. त्याला कुठेंतरी आंत बाहेर अंग अवघडून उभं रहावं लागे. कोंकणांतून आणलेली एक लांडी इजार अन् बिन हस्तारीचा हात धुलाईचा आंखूड सदरा तेवढाच त्याच्या अंगावर होता. डोक्यावरचे केस भादरलेले होते आणि केसाचा भोवरा व शेंडी ठळक उठून दिसत होती. घरांत एक नोकर व नोकराणी होती. पण तो आल्यापासून त्यांची चंगळ वाढत होती. जो तो त्याच्याच नांवाचा पुकारा करी. कुणाला पाणी आणून द्यावं लागे. कुणाचे कपडे शोधावे लागत. अल्पकाळच–आल्यावर त्याचं थंड निरस कौतुक काय झालं असेल तेवढंच. थोडसं.

मुंबई सोडून सर्व मंडळींबरोबर त्याला आगगाडींतून चुलत्यांच्याकडे जावं लागलं ती आगगाडींतील रात्र त्याला आठवली. एक डबा खास मिळाला होता. बोरीबंदर स्टेशनवर किती तरी मंडळी निरोप देण्यासाठीं व घेण्यासाठीं आली होती. तो जवळच उपेक्षित असा डब्याजवळ उभा होता. तें स्टेशनवरचं भव्य व गर्दीचं दृश्य त्याला अद्भुतरम्य वाटत होतं. त्याला सारखी आपल्या खेड्याची आठवण येत होती. वडिलांचे शब्द आठवत होते. कोंकणांत घरीं भिंतीवर लटकलेला त्याच्या चुलत्यांचा इंग्लंडमध्यें काढलेला रुबाबदार फोटो नजरेसमोर दिसत होता. आंतल्याआंत सारखं भडभडून येत होतं. त्याच्या अंगांत कोंकणांतल्या शिंप्यानं शिवलेला सुती स्वस्त कापडाचा गांवठी कोट होता. एक ध्यान दिसत होतं त्याचं तें स्वरूप. डब्यांत शिरल्यावर मधल्या बाकावर अवघडून तो तसाच बसून राहिला होता. त्याच्या चड्डीच्या खिशांत त्यानें वडिलांनीं अपूर्वाईनें दिलेले दोन रुपये पुनः पुनः हातानें घट्ट चाचपून जपून ठेवले होते. मधून मधून त्याच्या वाट्याला खाणं यायचं. तो तें संकोचत हळुहळुं चाबून खायचा. बरीच रात्र झाल्यावर त्याला केव्हांतरी झोंप लागली असावी. अर्धवट झोप होती ती. डब्यांतील, मंडळींच्या त्याच्याबद्दलच गोष्टी चालल्या होत्या. त्याच्या कानावर शब्द येत होते. कुणीतरी विचारीत होतं चुलतीला.

' हा कशाला येतोय आपल्याकडे ?...'

' त्यांचं खूळ कुठं गेलंय अजून ?...'

' म्हणजे ?...'

' शिकवणार आहेत त्याला...'

' हा शिकणार...फीः फीः फी...'

' तर काय ?...'

' धड मराठी तरी बोलतां येतं कां ग त्याला ?'

' ऐकलं नाहींस ?...'

' त्याचे ते हेल ...'

' आणि हा इंग्रजी शिकणार ?...'

' तुम्हांला आतांच सांगून ठेवतें. हीं कोंकणचीं पोरं फार वाईट असतात. चढवलंत तर डोक्यावर चढतील नी भारी होतील...'

' मी माझ्या खोलींतसुद्धां येऊं देणार नाहीं त्याला...'

' मी सुद्धां...'

त्यांच्यांत एक धाकटी होती. तो आल्यांपासून ती मात्र त्याला चांगली वागवत होती. प्रेमळ बोलायची. गोड हंसायची. ' तुझ्या कोंकणांत काय काय आहे रे ? म्हणून त्याला






अनुक्रमणिका

सारखे प्रश्न करायची. त्याला केक्स आणून द्यायची. वाटींतून आईस्क्रीम द्यायची. ती त्याला पण आवडली होती. कांहींशी त्याच्याच वयाची. पण गोरी, गुबगुबीत, उंच अन् देखणी. खिश्चनांच्या इंग्रजी शाळेंत जाणारी. गाणारी पण. कुठल्या तरी स्टेशनांत सकाळी गाडी उभी राहिली. तो तरीहि झोपूनच होता. उठायला त्याला संकोच वाटत होता. बाकीची मंडळी चहा, केक्स, पाव खाण्यांत मश्गुल झाली होती. धाकटी मग म्हणाली होती,

'आई, उठवू कां ग त्याला ?...'

'कशाला ?...'

'त्याला चहा...'

'अगं, कोकणांत कुठं मिळतो चहा आणि पाव...'

'खरंच...?'

'मग काय ?...आळशी बघ किती तो !...'

आतां तर जागेवरून उठणं त्याला अधिकच अवघड वाटूं लागलं. पण धाकटीला रहावेना. ती त्याच्या जवळ आली. तिनं त्याला हळुं गोड हांक मारली अन् तो उठून बसला. सारे खिसीखिसी हंसले होते...त्याला रडूं येत होतं. पण तें आवरून धरावं लागत होतं.

दुपारी केव्हांतरी मग सर्व मंडळी एका फार मोठ्या स्टेशनांत डब्यांतून खाली आली. त्याचे चुलते मोटार घेऊन सर्वांना न्यायला आले होते. त्या प्लॅटफॉर्मवर ते सर्वांत जास्त उठून दिसत होते. भव्य गौरवर्णीय देहयष्टी, रुंद भालप्रदेश, डोक्याला मधोमध पडलेलं टक्कल, पाणीदार डोळे, दुडीची हनुवटी व हंसरे ओठ. जरब बसविणारी गंभीर मुद्रा, अद्ययावत पद्धतीचा युरोपियन पोषाख. कोटाच्या आंत जॅकेट, नेकटाय. तें चुलत्यांचं दर्शन त्याला आवडलं. पण त्यांची भीतीहि वाटली. एक मन त्याचवेळीं त्यांच्याबद्दलच्या मनस्वी आदरानं भरून येत होतं. खरंच, केवढे मोठे आहेत आपले चुलते ! त्यांचं बालपण त्याला सारखं आठवूं लागलं. त्याचं मन कल्पना करूं लागलं. त्याला आपण चुलत्यांच्या ठिकाणीं आहोंत असं दिसूं लागलं. चुलते आपल्या जागीं दिसूं लागले. त्यांचीं मुलंबाळं अशीच दूरून सुटीचा आनंद लुटून पुनः घरीं परतली होती. तो त्यांना नेण्यासाठीं आला होता... आपलेच चुलते पुनः लहान बनून अन् आश्रित म्हणून त्याच्याकडे आले होते...इतक्यांत ताडकन त्याची तंद्री उतरली. चुलतेच त्याच्याशी बोलत होते. सर्व मंडळी मोटारींत बेऊन बसली होती. धाकटी अन् तो एकमेकाला बिलगून बसली होती...

'काय रे ? कसा झाला तुझा प्रवास ?' चुलते प्रसन्नपणें बोलत होते. काय उत्तर द्यावं तेच त्याला कळेना. तितक्यांत धाकटीच बोलली. 'बाबा, चांगला झोपून गेला होता अगदीं...'

'होय काय रे ?'

'हुं...' एवढंच कसंबसं लाजत संकोचत तो बोलला होता.

बंगल्यांत पाऊल टाकलं तो क्षण त्याला आठवला. पहिला मजला. नंतर दुसरा मजला. म्हणजे वर फक्त एक टेरेस अन् एकुलती एक स्वतंत्र छोटी पण छानदार खोली. त्या खोलीच्या शिखरावर आणखी एक छोटा सिमेंटचा जिना लावून, वर बसायला सपाट कठडे असलेली चौकोनी बैठक. तिथून त्या शहरांतील सुखवस्तु लोकांची ती सर्व वस्ती विस्तृतपणें व वैभवपूर्णतेनें दृष्टिपथांत यायची. खाली पहिल्या मजल्यावर दिवाणखाना होता. तिथें उंची पडदे टांगलेले होते. मऊ मऊ गादीच्या छोट्या मोठ्या खुर्चा होत्या. मधोमध गालीचा पसरलेला होता कोनाकोनात मोठमोठी काचेचीं कपाटें होतीं व त्यांत जाडजूड इंग्रजी ग्रंथ होते. आंत स्वयंपाक घर होतं. जेवणाचं स्वतंत्र व प्रशस्त वेगळं दालन होतं. प्रत्येकाला एक एक खोली होती व ज्यानें त्यानें आपापल्या नांवाचे फलक बाहेर लावले होते. चुलत्यांची स्वतःची व्यवस्थित रचना केलेली अभ्यासिका होती. तिथेंच त्यांचा झोपण्याचा पलंग होता. सर्व दारा–खिडक्यावर वाळ्याचे पडदे सोडलेले होते. नोकरचाकर अधूनमधून त्या पडद्यांवर पाण्याचे फवारे मारीत हिंडत असत.

## श्री

पूर्वी श्री असलेला ईश्वर
  झाला आहे श्रीयुत आतां
विचारतो ' मी आंत येऊं का ? '
  दरवाजांतुनि अपुल्या येतां.

सभ्यपणाचा रिवाज सारा
  बंधनकारक तयास होई
भलत्या जागीं निमंत्रणाविन
  अवतरण्याची त्यास मनाई.

साम्राटासम चराचरांतुनि
  होता पूर्वी संचारत तो
शिफारशींचीं घेउनि पत्रें
  संकोचानें आतां फिरतो.

—कुसुमाग्रज

नाहींतर आपलं कोकणांतलं पडकं घरकूल !

अर्थात् हें सारं वैभव त्याच्या चुलत्यांचं होतं. एका मोलकरणीच्या मुलानं स्वतःच्या कर्तबगारीवर बापकमाईची दिडकी न घेतां उभविलेलं हें मानाचं व आत्मोद्धाराचं स्वाभिमानी ऐश्वर्य होत. असा थोर चुलत्यांचा तो पुतण्या होता. त्याच्या घरीं रहाण्याचं भाग्य त्याच्या वाट्याला आलं होतं. त्यांनीं उपसलेल्या कष्टापेक्षां त्याच्या वाट्याला उद्यां येणाऱ्या कष्टांचं स्वरूप त्याला अगदींच मामुली वाटूं लागलं. आपण खूप खूप शिकून घ्यायचं असा त्यानं मनाचा सहज निर्धार केला.

पण किती वर्षं तो तिथं राहूं शकला ?

चुलतीनं धड त्याला कधीं अभ्यास करूं दिला नाहीं. नवे कपडे क्वचितच त्याला शिवले गेले. दुसऱ्यानें टाकलेले कोट, चड्ड्या, अंगरखे, बूट, चप्पलं घालूनच त्याला वावरावं लागे. तरीहि त्याचा शाळेंत पहिला–दुसरा नंबर यायचाच. शाळेंत त्याचं कौतुक व्हायचं. सुखवस्तु पांढरपेशा मित्रांचं वर्तुळ त्याच्या भोंवती गोळा व्हायचं. त्याला घरीं येण्याचीं आमंत्रणं यायचीं. चुलत्याच्या बंगल्यावर त्याला त्याचे मित्र भेटायला यायचे. पण चुलती सर्वांना मग्रूरपणें हाकलून द्यायची अन् त्याला कामाला जुंपायची. कुठें कोळसेवाल्याकडे जा. कुठें वाण्याकडे जा. कचरा काढ. पाणी भर. जेवतांना सर्वांच्या मागून त्याला जेवायला मिळायचं. मात्र धाकटी त्याच्यासाठीं रेंगाळत वेळ काढीत जेवायची. हळूंच आपल्या ताटांतलं त्याच्या ताटात टाकायची. त्याच्या चुलत्यांचं दर्शन आठवडे आठवडे त्याला होत नसे.

एके दिवशीं दुपारी धाकटी त्याच्याकडे आली. ती मात्र त्याला आपल्या खोलींत अभ्यास करूं द्यायची. तिनं निरोप आणला होता.

'तुला बाबांनीं बोलावलंय्...'

'कधीं ?'

'आत्तां...आहेस तसाच चल...'

...पान ४३ वर

एखाद्या कामातुर पुरुषाच्या केंसाळ हातासारखा अंधार पुढें सरकत होता आणि दुबळा, भयाकुल प्रकाश अंक आकसून पाऊल मागे घेत होता. अण्णा डाव्या हातांत कांठी सांभाळीत जिना चढून वर आले. घरापासून चार पावलें ते ळळत लोंबत, फरपटत गेले होते पण तेवढ्यानें त्यांना चांगलीच धांप लागली होती. ते उसासत वर आले आणि दमून जाऊन त्यांनीं खुर्चीवर बैठक मारली. काठी बाजूला ठेऊन आपले आंखडलेलें अर्धांग ताणण्याचा प्रयत्न केला. कमरेला रग लागूं लागली तसे ते पुन्हां ताठ झाले. टेबलाचा आधार घेऊन एखाद्या ओल्या कपड्याप्राणें त्यांनीं अंग पिळवटलें आणि मग कुरकुरणाऱ्या चाकाला वंगण मिळावें त्याप्रमाणें लटक्या पडलेल्या त्यांच्या अर्धांगांत जीवन-रसाची धार पाझरत राहिली. एक हात वर करून त्यांनीं मोठा आळस दिला तेव्हां ते पुरते सुखावले शेजारच्या घरांत चालू असलेल्या रेडिओवरील गाण्याला खुर्चीच्या हातावर ताल धरूं लागले.

तेवढ्यांत दहावीला असलेली त्यांची मुलगी मालू दिवाणखान्यांत आली. तिच्या बरोबर तिची एक मैत्रीण होती. खिदळत दोघीं आंत आल्या. अण्णांकडे लक्ष जातांच ती मैत्रीण एकाएकी गप्प झाली. बुजऱ्या नजरेनं त्यांच्या-कडे पहात ती कॉटवर बसली. मालू मात्र मोठमोठ्यानें बोलत होती. शाळेंतल्या एका बाईची ड्रॉइंगमास्तरशीं काय भानगड आहे हें ती खुलवून सांगत होती. 'अग, परवां लॉ कॉलेज टेकडीवर दोघं गेलीं होतीं म्हणे!'

'कशाला?' त्या मैत्रिणीनें अजाणपणें विचारलें.

'इश्य! तूं म्हणजे अगदीं ट्यूबलाईट आहेस बघ! अग, कांहींतरी जंमत करायला-मंदीच्या भाषेंत कांहींतरी 'बांडुंग' करायला!' आणि मालू ढळता पदर दांतांच्या चिमटींत धरून खिदळत सुटली.

ती मैत्रीण न हंसता चमकून अण्णांकडे पाहूं लागली. तशी मालू हळूं आवाजांत सांगू लागली, 'त्यांना अर्धांगवायु झालाय-दीड-दोन वर्षे झालीं-अर्धं अंग लुळं पडलंय-ऐकायलाहि कमी येतंय्-'

अण्णांना तीं वाक्यें स्पष्ट ऐकूं आलीं आणि थोबाडींत मारल्यागत झालें. त्यांना वाटलें कीं उठावें आणि वाह्यात मालूच्या कानफटांत लगवावी. लहानपणीं अनेकदां लगवत होतों तशा! ऐकायला कमी येतं काय? पण त्यांचें अंग शिशाप्रमाणें जड होऊन गेलें होतें-त्यामुळें उठवत नव्हतें. शिवाय पूर्वीची मालू मार खातांना भिजलेल्या मांजरासारखी थरथरत खालीं मान घालून उभी रहायची आणि ही मालू-हजारदां चोरी करून पिंजऱ्यांत उभ्या रहाणाऱ्या निर्ढावलेल्या चोरासारखी बेरड-आतां अंगाला हात लावला तर अकांडतांडव करून सारा वाडा गोळा करील—

अण्णा तसेच बसून राहिले. सुन्नपणें दोघीं-कडे पाहूं लागलें. एखाद्या चिरकलेल्या रेकॉर्ड-मधून जसा आवाज येतो तशा स्वरांत दोघी बोलत होत्या. त्या मास्तरणीच्या आणखी कांहीं भानगडी दोघी संथपणें रवंथ करीत होत्या. त्यांतला रस मोठ्या मर्जेत शोधून घेतांना त्यांच्या चेहऱ्यावर एकप्रकारच्या तृप्तीचे भाव तरळत होते. अण्णांना तेथें बस-वेना-त्या मास्तरणीच्या 'बांडुंग' मध्यें त्यांना कांहींच रस नव्हता. मालूबद्दल वाटणाऱ्या संतापाचे कढ मागें परतवीत ते उठले व



—सुभाष भेण्डे



...एक पाऊल पुढे टाकलंत तर मी ओरडेन–किंचाळेन–' 'बघूर–जगू... हे सर्व गोळा. येऊं देत मुलं. बायको नवऱ्याला ... दे त्यांना...' अण्णा म्हणाले. तशी त्यांनी तिला जवळ ओढली... तिचें शरीर थरथरलें... अशी ही एक विलक्षण कथा...

धडपडत गॅलरींत आले. धुरकटलेल्या रस्त्यावर एकुलत्या एका दिव्याचा प्रकाश ओरखडे पाडीत होता. समोरच्या दुमजली घराच्या खालच्या पायरीवर एक भिकारीण फतकल मारून बसली होती. तिच्या पुढें लूत भरलेलें एक कुत्रें तोकडी शेपूट हलवीत जीभ वासून उभें होतें. त्या भिकारणीनें एक भला मोठा दगड उचलून त्या कुत्र्यावर भिरकावला. दुडक्या पायानें, केंकाटत तें कुत्रें पळून गेलें आणि त्याच्या आवाजानें जणूं गल्लींतल्या किर्रर्र शांततेचा पडदा टरारत फाटत गेला.

अण्णा मागें वळले आणि थरथरत आंत आले. मालू मैत्रिणीला घेऊन निघून गेली होती. स्वैंपाकघरांतून फरफरणाऱ्या स्टोव्हचा कर्णकटु आवाज येत होता. अण्णा आपल्या आवडीच्या हार्मोनियम पेटीपाशीं आले. आपल्या दुबळ्या उजव्या हातानें मागचा भाता हलवून ते डाव्या हाताचीं बोटें पट्ट्यांवरून फिरवूं लागले पण ती कांहीं केल्या त्यांच्या मनासारखी सरकेनात. वादळांत थरथरणाऱ्या वेलीसारखीं तीं वेडीवांकडी होऊं लागलीं. शेवाळलेल्या दगडावरून पाय घसरावा तशीं तीं बोटें पांढऱ्या काळ्या पट्ट्यावरून खालीं सरकूं लागलीं. दांतओठ खाऊन मोठ्या भिनतवारीनें त्यांनीं बोटें स्थिर केलीं आणि पुन्हा तेवढ्यांत यशोदा घाईघाईनें आली आणि म्हणाली, 'नीट वाजवायला येत नाहीं तर कशाला खेळ करतांय पेटीशीं ? आधींच माझं डोकं दुखतंय आणि त्यांत तुमचं हें संगीत–'

तिला पाहून अण्णांनीं पेटीवरलीं बोटें उचललीं. मग ते तोंड वेडेवांकडें करीत मळमळीत हंसत म्हणाले, 'काय झालंय आज कोण जाणे–! सूर जमतच नाहीं पूर्वीसारखा–'

'आतां नाहींच जमणार तो पूर्वीप्रमाणं–सगळं आयुष्य बेसूर झालंय–यांतून केव्हां सुटका होईल तेव्हां खरी–' यशोदाचे ओठ थरथरतत होते. अलिकडे ती अशीच चिडल्यासारखी बोलायची आणि मग तिचे दोन्ही ओठ कितीतरी वेळ थरथरत रहायचे !

अण्णा पिचपिचित हंसले. डावा हात आपल्या ओठांवरून फिरवून अंग हेलकावीत म्हणाले, 'तुझं डोकं दुखतंय तर नाहीं वाचवत पेटी–! अग–केवळ करमणूक म्हणून जरा...—'

कांहींतरी पुटपुटत यशोदा आंत गेली. दरम्यान हातांतल्या चेंडूसारखी उशी घेत शरद आंत आला. त्याच्या मागोमाग पांच-सहा पोरेंहि आंत गेलीं. सारीं पोरें चेंडू एकमेकांच्या अंगावर फेकीत किंचाळूं लागलीं. मध्येंच तो अण्णांना लागला तेव्हां उलट शरदच चिडला आणि ओरडला–'अण्णा' आम्हांला इथं खेळायचंच ! तुम्हांला चेंडू लागेल आणि मग माझ्या नांवानं ओरडाल.'

'नाहीं लागणार चेंडू–नाहीं लागणार–' अण्णा चेहरा वेडावांकडा करून म्हणाले.

तें ऐकून शरद जास्तच चेकाळला. स्वैंपाकघराच्या दिशेनें तोंड करून पुन्हां किंचाळला· 'ए आई–बघ ग हे अण्णा जात नाहींत इथून ! अंगावर चेंडू बसला म्हणजे आजारी पडतील–आमच्या नांवानं ओरडतील–'

अण्णा भांबावून उभें राहिलें. पाय ओढीत दुसऱ्या खोलीकडे जाऊं लागले. यशोदा म्हणत होती तेंच खरें होतें–पूर्वीसारखा आतां नाहींच जमणार सूर–! हेंच काटें पूर्वीं डोळ्याला डोळा द्यायला घाबरायचं–अण्णा दिसलें कीं आईच्या पदराचा बोळा तोंडांत कोंबून भेदरत उभं रहायचं–इतकंच नव्हे तर अण्णांनीं जरा डोळे मोठें केलें कीं चक्क चड्डींत मुतायचं ! पण आतां सारं बदललं–सगळंच उलटंपालटं झालं–ती मालू तशी आणि हा शेंबडा शरद असा–सूर लागत नाहीं, सूर कांहीं केल्या लागत नाहीं....

त्यावेळीं होतेच अण्णा वाघासारखे. तासन्‌तास राबायचे आणि नोटांचीं बंडलें न मोजतां खिशांत टाकायचे ! शिक्षण विशेष झालें नाहीं तरी धडाडीनें त्यांनीं मोटारी दुरुस्त करायचं वर्कउघडलें होतें शॉप आणि रात्रंदिवस रक्ताचें पाणी करून पाण्यासारखा पैसा कमावला होता. अपुऱ्या भांडवलावर उघडलेल्या दुकानांतून मिळवलेल्या पैशांवर त्यांनीं दुमजली बंगला उठवला होता. मोठी जागा विकत घेऊन त्यांनीं वर्कशॉपचा पसारा वाढवला होता. पण मग कोणीतरी चेटूक केल्यासारखें सारें घडून आलें. गरम कांचेवर पाणी पडून ती तडकावी तसें कांहींसें झालें. कुणीतरी चुगली केली आणि इन्कमटॅक्स खात्यानें त्यांच्यावर नोटीस काढली. त्याला अण्णा घाबरले नसते. पण त्या भानगडींत कोणी पोलिसाचें नांव घेतलें–! तुरुंगाची आठवण दिली तसें अण्णा हबकून गेले. कामाला वाघ असलेले अण्णा बेअब्रूच्या



बेड्यासारखे दिसतां काय ? अहो जवळजवळ १२ वार कपडा लागला या 'स्वीमिंग सूट'ला—

अनुक्रमणिका

## फूल

माझ्या दारीं
तुझ्या स्मृतीचें फूल उमललें
गंध-प्रकाशीं
घनतिमिरीं या रूप उजळलें
मूकतेंत या
भावबोल तव घुमत राहिले
शून्यतेंत या
ध्यासानें तव व्याकुळ झालें
तुझ्या आकृती
तरळतात या अंवतीं भवतीं
दिवसा रात्रीं
मला वेढती तव चिन्मूर्ती !
–माझ्या दारीं
तुझ्या स्मृतीचें फूल उमललें,
अश्रूंच्या मी
दंवबिंदूंनीं तया भिजविलें !

## मध्यरात्र

आषाढीची मध्यरात्र
सुन्न भंवतीं अंधार...
टपटप पावसाची
पाउलें हीं कौलावर.

वारा धडक्या मारतो
घरांवर, दारांवर
आंदोळती झाडे आणि
पागोळयांची सरसर.

सांदींतला दीप विझे
उरे अंधारीं काजळी
जळामध्यें न्हाऊनही
दाह जीवनास जाळी.

खिन्न गूढ गांभीर्यानें
गेलें मन भरावून
आणि कसें नकळत
आले नयन भरून !

—सूर्यकांत खांडेकर

भीतीनें पार कोलमडले. त्यांच्या पीळदार शरीरांतली शक्तीच गेली. कमवलेलें सर्व धुळीला मिळालें. ऐसपैस जंगी वर्कशॉप डोळ्यादेखत फुंकून टाकावें लागलें आणि घरांतली चीजवस्त, दागदागिने विकून उरलेल्या पैशाची भरपाई करावी लागली. एकुलतें एक दुमजली घर तेवढें राहिलें. त्या धक्क्यांनें अण्णा सहा महिने अंथरुणाला खिळून होते. तो आघात त्यांना पेलला नाहीं. अण्णांची अर्धी शक्ति त्यानें शोषून घेतली. अण्णांचें अर्धें अंग लुळें पडलें, पार निकामी झालें. एखाद्या किडयाच्या अर्ध्या अंगावर पाय पडावा व तो तसाच लुळत लोंबत पुढें सरकावा तसें ते जगूं लागले. राखेंतून बंगला उठवायची पूर्वीची जिद्द आतां खचली. साधीं बोटें देखील पेटीवरून नीट फिरेनात–पूर्वीसारखे सूर काढतां येईनात—

गेल्या दोन वर्षांत अण्णा पुन्हां पुन्हां आयुष्याचा चुकलेला हिशेब आठवत होते. आताहि त्या आठवणीमुळें बाण लागलेल्या पांखरासारखें ते तडफडले. एके ठिकाणीं बसवेना म्हणून पुन्हां ते दिवाणखान्याकडे जाऊं लागले. जातांना त्यांनीं स्वैंपाकघरांत डोकावून पाहिलें. गुडघ्याभोंवती मिठी घालून यशोदा शेगडीपाशीं बसली होती. तिच्यासमोर दातार वकील पाटावर बसले होते. त्यांनीं टोपी हातांत काढून घेतली होती त्यामुळें त्यांच्या निमटकलाभोंवतीं टोपीचा पडलेला कच स्पष्टपणें दिसत होता. डोक्याच्या अर्ध्या भागावर तुरळक केस असल्यामुळें अण्णांना ते उगाचच खुनशी वाटत. यशोदेच्या थोरल्या भावाचे ते मित्र होते. अद्याप देण्याघेण्याच्या किरकोळ बाबी राहिल्या होत्या. त्या बाबतींत सल्ला देण्यासाठीं दातार वकील अधून मधून येऊन जात. ते आले कीं अण्णाच्या कपाळावर आठी पडे. तासन्तास कज्जेखटल्यांबद्दल काय बोलायचें असतें हें त्यांना उमजत नसे. दातार वकिलांच्या नाटकी बोलण्याची तर अण्णाना मनस्वी चीड होती. आतां सुद्धां अण्णाच्या चाहुलीनें ते बोलता बोलता मध्येंच थाबलें व नाटकी हंसून म्हणाले–'काय अण्णा, बरं आहे ना ? उगीच फिरूं नका इकडं तिकडं-विश्रांती घ्या हवी तेवढी–' आणि अण्णा काय म्हणतात याची वाट न पहाता टोपी माडीवर आपटीत ते पुन्हां यशोदेशीं बोलूं लागले.

'हो ना–आता जन्मभरं विश्रांतीच आहे–' यशोदा उद्‌गारली. अण्णांनीं तिच्याकडे, तिच्या थरथरणाऱ्या ओठांकडे पाहिलें व ढांसळलेल्या मनानें ते मागें वळले. डावा हात छातीवर दाबून धरीत आपल्या खोलींत शिरले. खोलींतल्या गुडुप अंधारानें त्यांचें मन निवल्यासारखें झालें. पलंगावर गुंडाळून ठेवलेल्या बिछान्याच्या पाठीवर अण्णा रेलून बसले. हीच यशोदा रात्र रात्र त्यांची वाट पहात जागत रहायची आणि तिच्याकडे लक्ष न देतां, बूटदेखील न काढतां ते बिछान्यावर पडायचे–! मग यशोदा पायाशी बसून बुटाच्या वाद्या सोडूं लागायची–अंगावर पांघरूण घालायची ! मित्रमंडळी गोळा करून कधीं अण्णांचा प्यायचा कार्यक्रम असे तेव्हां सोड्याच्या बाटल्या आणण्याचें काम तिला करावें लागे. व्हिस्की प्याल्यानंतर मटण लागतें म्हणून ती मुद्दाम शेजारच्या जगतापांच्या बायकोकडून मटणाची कृति शिकली होती. एकदा तर त्यांनीं एका कवकवीत, कोंवळ्या कलावंतीणीला घरीं आणून नाचवली होती आणि रात्रभर तिच्यासह हैदोस घातला होता. तेव्हा 'कां' अन् 'कसें' विचारायला यशोदेनें तोंड उघडलें नव्हतें ? तेवढी तिची हिंमतच नव्हती–!

तीच यशोदा आतां पाहून न पाहिल्यासारखें करते ? त्या निमटकल्या, डोक्याला टोपीचा कच असलेल्या दातार वकिलाशीं तासन् तास बोलत बसते ! वेतानें फोडून काढली पाहिजे. हंटरनें अंग सोलून काढलें पाहिजे !

अण्णा स्वतःशींच बोलत होते आणि स्वतःच दचकत होते. आणि मग त्याना ती भिकारीण आठवली. ती भिकारीण–तें कुत्रें आणि धाड्दिशीं अधु अंगावर आदळणारा शरदचा चेंडू–मालूच्या शाळेंतल्या मास्तरणीचें 'बाडुंग' 'अग त्याना ऐकूं सुद्धां येत नाहीं—' आणि धांपा टाकणारा, हार्मोनियम पेटीचा भाता—

'अण्णा–कितीदा सांगितलं जेवायला या म्हणून–' मालू ओरडत आत आला तेव्हां अण्णा उठले. न्हाणीघरांत जाऊन त्यांनीं ओला हात तोंडावरून फिरवला आणि ते स्वैंपाकघरांत आले. पाटावर नीट बसता येत नव्हतें म्हणून त्याच्यासाठीं बसायची वेगळी व्यवस्था होती. कोपऱ्यात ठेवललें स्टूल त्यांनीं मध्यभागीं आणलें आणि खुर्चीवर बसत, त्यांनीं यशोदेला विचारलें, काय दातार वकील काय म्हणतात ?'

यशोदेनें प्रथम त्यांच्याकडे लक्ष दिलें नाहीं. मग त्यांनीं तो प्रश्न पुन्हां एकदां विचारल्यावर ती रुक्षपणें म्हणाली, 'काय म्हणणार ? तुम्ही

करून ठेवलंय् तें एकएक निस्तरायचं काम-दुसरं काय ?'

'तरीपण ?...

'तुम्हांला काय कळणार आहे त्यांतलं ? त्यांचा एक मोठा आधार आहे आपल्याला म्हणून तर सारं निभावतंय्-' यशोदा उत्तरली. तेवढ्यांत शरद ओरडला-'अण्णा, त्यानी पेढे आणले होते-

'कसले पेढे ?' अण्णांनीं विचारलें.

यशोदा उत्तरली-'त्यांनीं एक मोठी केस जिंकलीय म्हणे-कांहींतरी दोनतीन हजारांची प्राप्ति झाली—'

'अरे वा-जोरांत आहे कीं मामला—'

हो ना-सगळ्याचंच जोरात चाललंय-साऱ्यांचीच ऊर्जितावस्था आहे-आपली तेवढी-' यशोदेनें वाक्य अर्धवटच सोडलें. तें ऐकून अण्णाना थंडीच्या दिवसांत तोंडावर गार पाण्याचा हबका मारल्यागत झालें. दातार वकिलांबद्दलची कांटेरी असूया त्यांच्या मनात रुतून बसली. ऊर्जितावस्थेतून जाणारे-यशोदेला आधार वाटणारे दातार-निमटकलावर टोपीमुळें पडलेल्या गोल वणांत गिरमीट घालून फिरवावें-त्यांच्या खुनशी थोब़ाडावर डाव्या हातानें थाड्दिशी लगवावी-मग तोहि हात लुळा पडला तरी पर्वा नाहीं—पर्वा नाहीं.

अण्णांना जेवण गेलें नाहीं. अन्नात यशोदेचे कडू शब्द मिसळले होते. भातभाजीची चवच गेली होती. उगीच भात चिवडून ते उठलें आणि कांहीं न बोलतां हात धुऊन आपल्या छोट्या घरट्यांत आले. भकासपणें खिडकी-बाहेर पहात नुसते बसून राहिले.

एखाद्या उठवळ बाईसारखी रात्र डोळ्यांत काजळ घालून बसली होती. रस्त्यावरील दिव्याच्या अपुऱ्या, धुसर उजेडामुळें काळ्या-कभिन्न बाईनें तोंडाला सस्ती पावडर फासल्या-सारखें वाटत होतें. समोरच्या अरुंद रस्त्याच्या डोळ्यांवर झोपेचें सावट आलें होतें. मधूनच कुत्रीं केविलवाण्या आवाजात ओरडत आणि पेंगू लागलेला रस्ता दचकून जागा होई.

रात्रीच्या त्या भकास शांततेंत अण्णांचें मन उन्मळून आलें. जाणीवेच्या कप्यांत खोलवर गेलेली व्यथा रात्रीच्या त्या भयाण एकांतात उसळून वर आली. दिवसभर ते हॉलमध्यें पडून रहात-त्यामुळें अंग नुसतें आबून जाई आणि मग रात्रभर डोकें जड होऊन डोळ्याला डोळा लागत नसे. अंधाराकडे तासन्तास टकटकीत उघड्या डोळ्यांनीं पहात. ते कांहींतरी आठवूं लागत-कसलीतरी न सुटणारी गणितें करूं लागत...

आजहि ते बिछान्यावर थोडा वेळ बसून राहिले. उलटेसुलटे विचार मनांत घोळूं लागले. बसण्याचा कंटाळा आला तसे तोंडाने 'श्रीहरी श्रीहरी' म्हणत अण्णा बिछान्यावर आडवे झाले. वास्तविक देवाचें नांव घ्यायचें हें वय नव्हे-तशी अजून चाळीशी देखील ओलांडली नाहीं आपण-अजून अंगांत रग आहे आपल्या. अजून तारुण्य अवशिष्ट स्वरूपांत आहे-अर्धांग लुळं पडलं म्हणून काय झालं ?

अण्णा आपल्याशींच हंसले. पूर्वीं धंदा करीत असतांना दुसऱ्या वर्कशॉपचीं गिऱ्हाईकें कशीं ओढून घ्यावीत याचा ते विचार करीत आणि अनेक कावेबाज उपाय त्यांना सुचत. आज कितीतरी दिवसांनीं तसला कावेबाजपणा त्यांच्या डोक्यांत घोळूं लागला. कसल्यातरी कारस्थानी विचारांनीं त्यांच्या साऱ्या अंगांतून गरम रक्ताची धार पाझरूं लागली. अर्धमेल्या, ढगाळ आकाशांत वीज चमकावी त्याप्रमाणें लुळ्या अवयवांत चेतना आली. त्याचें अंग थरथरूं लागलें, पेट घेऊं लागलें. त्यांनीं मोठ्यानें हांक मारली- 'यशोदा-' थोडा वेळ थांबून पुन्हां त्यांनीं घोगऱ्या आवाजात हांक मारली-'यशोदा—'

यशोदा घाईघाईनें आली. त्रस्त मुद्रेनें त्यांच्याकडे पहात म्हणाली-'रात्री बेरात्रीं असं नांव घेऊन ओरडायला काय झालं तुम्हांला ?'

त्यांनीं डोळे फिरवीत आपला डावा हात तिच्या खाद्यावर ठेवला. एखादी पाल अंगावर पडावी तसा तिनें तो हात झिडकारून टाकला. ते घोघऱ्या आवाजात पुन्हां म्हणाले-'यशोदा-'

त्यांच्या डोळ्यातली आग पाहून ती चम-कली. भयानें मागें सरली आणि अस्फुटपणें म्हणाली-'मी जातें-नको-नको-मला सोडा-'

ते मागे सरले नाहींत. पुढें येऊं लागले तशी ती पुन्हां म्हणाली-'एक पाऊल पुढं टाकलंत तर मी ओरडेन-किंचाळेन-'

तोंडांतून लाळ गळावी तसें हंसू त्यांच्या अर्धवट उघड्या तोंडातून सांडूं लागलें. तिचे हात पकडून ते म्हणाले-' जरूर जरूर-! होऊं दे इथं सगळा वाडा गोळा-येऊं देत मुलं इथं-बायको नवऱ्याला झिडकारतेय हें पाहूं दे त्यांना-'

तिच्या डोळ्यांतील स्फुल्लिंग विझल्यासारखा झाला. हळू आवाजांत ती म्हणाली, 'नकोसं वाटतंय कांहींच नकोसं वाटतंय ! कसली वासना नाहीं पाया पडते-नको-'

'मग मला पैसे दे-मी बाहेर जातों-लग्नाच्या बायकोनं नाकारलं म्हणून काय झालं ? बाहेरच्या वाटा मोकळ्या आहेत मला-तोंड रंगवून बसलेल्या—'

तिनें भेदरून. आपले हात त्यांच्या तोंडावर ठेवले. तिचा प्रतिकार लुळा पडला. त्यांनीं हात पुढें करून तिला उंबऱ्याच्या आंत ओढली व दाराला कडी लावली, तिच्या भेदरलेल्या चेहऱ्याकडे पाहतांना त्याचे डोळे लकाकूं लागले-विजयाचें हास्य हंसूं लागलें-! तिचे ओठ थरथरत होते. ती मनस्वी चिडल्यावर थरथरत असे. तें पाहून अण्णा पुन्हां एकवार हंसले. हात पुढें करून त्यांनीं मग दिवा मालवला आणि त्यांचे आकारहीन, कमजोर ओंठ त्या कभिन्न अंधारांत तिचे थरथरणारे ओंठ शोधूं लागले।

●●●

## धीम्या धीम्या चालण्यांत

धीम्या धीम्या चालण्यांत
मला तुडव तुडव
रंगाळत्या हसण्यांत
मला तुडव तुडव
संथ सरळ पाहता
नीज उडव उडव
अजूनी न भेटलेलें
स्वप्न घडव घडव
एका चिरंतनाशींच
नातें जडव जडव

●●●

## आण घालुनी....

आण घालुनी प्राणाची तर
वाऱ्यावरतीं तुला सोडलें
शपथ ऐकवुन तुजभवतींचे
बंध मोकळे सगळे केले
आकाशांतुन दिशादिशांचें
हाक घालिते तुज आमंत्रण
धरतीवरती खिळलेली मी
तुज नजरेनें जपतें येथुन
कळलें ना तुज या मातीचा
रक्ततांबडा रंग निराळा
इथें, तिथें वा ऐस कुठें पण
ह्या मातीचा मंत्र फेकला.

—शिरीष पै



अनुक्रमणिका

# भीष्माचा डोंगर



*मुंबईची एक कंपनी डोंगरांत मँगनीजच्या खाणी सुरू करणार या बातमीचं गांवांत स्वागत होत नाहीं.*

*दाजी नाबर तर मुलखावेगळाच! गांवच्या भीष्माचं भस्म करायला त्याचा विरोध असतो. आणि कधीं नाहीं, पण या वेळेला मात्र लोकांचा त्याला पाठिंबा मिळतो. अर्थात हा पाठिंबा सरळ नव्हता. कंपनीबद्दल गांवांत एकंदरींत संशय होता, दुस्वास होता. कांहीं व्यवहारी अन् मतलबी माणसं या परिस्थितीचा फायदा घेण्याच्या उद्योगाला लागतात.*

*हें कळतं, तसा अण्णागुरुजी चवताळतो. तो बामणांनाच शिवीशाप देत सुटतो. काठीनं त्यांना ठेचायला निघतो. आणि त्याच्या हातचा प्रसाद खातो दाजी नाबर. अण्णाचा भाचा विजय आणि दाजीच्या घरची मंडळी मध्यें पडतात. आतेबाई तर अण्णागुरुजींच्या हाताला कोलींत लावायला निघते. दाजी हंसत सांगतो, ' हाताला नको! हातांत दे कोलींत. जा गांव पेटव म्हणावं! '...*

**....आतां पुढं वाचा.**



**मुंबईच्या** माणसाबद्दल नाहींतरी गांवांत बरं मत नव्हतंच! पूर्वग्रह, दुसरं कांहीं नाहीं! आणि गांवची लोकं बाकी कांहींहि सोडतील. एकादवेळ कमरेचं वस्त्रसुद्धां! पण कधीं बापजन्मी करून घेतलेले हे ग्रह मात्र सुटणारं नाहींत.

वास्तविक विजयचं व्यक्तिमत्व असं प्रसन्न नि आर्जवी होतं कीं एकाधावर त्याची तेव्हांच छाप पडे. दिसायला तो बऱ्यांतला होता. वर्णानं चांगलाच उजळ, उंचेला, मेहनतीचं बांधीव शरीर. आणि विशेष म्हणजे सदा हंसतमुख, बोलण्यांत मोकळा. खोटा तोंठा नाहीं कीं नसता अगाऊपणा!

पण ज्यांअर्थी तो इतका बरा दिसतो, त्याअर्थी तो बरा नसलाच पाहिजे! गोष्ट सरळ आणि उघड होती. दिसतं तसं नसतं! गांवानं विजयला दोन दिवसांतच कंडम करून टाकला. घरांत इस्त्रीचे स्वच्छ कपडे घालणारा आणि पोमेडनं चापचोपून केस बसविणारा इसम एक धोबी असला पाहिजे, नाहींतर न्हावी–पण विजय होता अण्णागुरुजींचा भाचा. म्हणजे अण्णाच्या धाकट्या बहिणीचा, कमळी भांविणीचा पोर. आणि हें ज्ञान झालं तसे गांवच्या लोकांचे बरेचं प्रश्न चटाचट सुटले.

म्हणजे आतां मुळीं प्रश्नच राहिला नाहीं. सगळा उलगडा झाला.

बरा देखणा दिसतो—विजयला बघून गांवांत सुरू झालेला अगांतूक विषय.

—असणारच! कोणाची औलाद? भाविणीची. याची आयशी ती कमळी अशी फटाकडी होती—वर्णन नाहीं. गांवांत असती तर तिचं हें पोरगं देखील तसंच सुंदर निपजतं—!! पुढं निःश्वास, हळहळ.

बी. ए. पर्यंत शिकला आहे म्हणतात!–मुख्य विषयाचं एक वाकडं वळण.

—कसल्या बिया? काजूच्या का दुध्याच्या? तर त्या खाल्ल्या न् झाला बी. ए.! इतकं सोपं नाहीं तें. अरे एकदम साहेबाची डिग्री ती. कलेक्टर, मॅजिस्ट्रेट अशा एकाहून एक बड्या लोकांकडे असते. मोठ्या लायकीचं काम आहे तें बाबा! तसंच ढाळक्याचं. भाविणीच्या ह्या पोराला त्या पुस्तकांचं ओझं सुद्धां नाहीं झेपायचं. साफ चिरडून जाईल! काय? हा कसला होतोय बी. ए. हूं!



एक मात्र आहे! या कलियुगांत कशाची कांहीं सुद्धां गॅरन्टी नाहीं. म्हणजे आतां बघा कीं! ज्यांनीं शिकायचं तीं हीं बामणाचीं पोरं शाळा टाकून खुशाल वांडपणा करूं लागलींत. आणि कुडवाळ्या-माडवाळ्याचीं पोरं शिक्षणासाठीं जीव टाकूं लागलींत. कलमी आंबाच राहिला नाहीं म्हणून हा रायवळ माल खपू लागला आहे बाजारांत! कोणीही उठावं, शाळेंत जावं, पास व्हावं! दाखवावं-काय तर सॅर्टिफिकिटं. तीं बाकी नीट फ्रेम करून ठेवतील! बरोबरच आहे! शिक्षणानं आलेलं ज्ञान, अक्कल, पात्रतानिदान दाखविण्यापुरती तरी असायला हवी का नको? छाः, कांहीं म्हणा शिक्षणाला अर्थ नाहीं राहिला. तर काय? भाविणीचा हा पोर बी. ए. पास होतो आणि भाऊ कुळकर्ण्यांचा द्वारक्या आणि बाबू नाबराचा बंड्या साधे एस्‌एसशीसुद्धां होत नाहींत! आं! म्हणजे हें काय शिक्षण का चेष्टा?–

उभी मुंबई टाकून नोकरीसाठीं इथं गांवीं यायचं याला कारणच काय?– आणखी एक यक्षप्रश्न कीं ज्याचं उत्तर खुद्द विजयला देखील देतां आलं नसतं असा गांवांत लोकांचा समज होता. पण त्यांना मात्र तें बरोबर ठाऊक होतं.

नोकरी काय, साहेब याच्या तोंडाकडे बघून देणार? कां याच्या नट्टयापट्टयाला भुलून? नोकरी मिळवायची म्हणजे माणसाला डिग्रीटी लागते, क्वालिटी लागते, काय! ती आहे याच्यांत? हा असा पोरकट, थिल्लर. हंसतो काय, नटतो काय! चालणं तेव्हढं बघावं-बरं टेचांत असतं. आणि बोलणं अर्धवट, बायकी! नोकरी करायची म्हणजे हा असा नखरा नाहीं चालत. तिकडे कसं मानेवर खडा ठेऊन काम करावं लागतं. साडेदहा ते साडेपांच हा झाला रोजचा हॉपीस टाइम! पण खरं म्हणजे साहेब म्हणेल तेव्हढं बसावं लागतं. नाहींतर डिसमिस, बडतर्फ! आतां हीं असलीं कामं ह्याच्यानं होणार आहेत? याची इस्तरी बिघडायची, केसांचा भांग विस्कटायचा! काय? भरतीचं पाणी खाजणांत, तशीं शहरचीं हीं नालायक माणसं खेड्यापाड्यांतच भरायचींत! आतां आलाच आहे, तर राहिना! नाहींतरी अण्णागुरुजींची शाळा आहेच. खाजगी खरी, पण शाळाच ना? अण्णाचंहि आतां वय झालं. मामाची ही शाळा संभाळली भाच्यानं तरी खूप झालं ...!

अर्थात विजयला याचा पत्ता नव्हता. त्याला तर वाटायचं लोकं एकंदरींत आपल्यावर खुष आहेत.

कुठं कधीं बाहेर पडलाच तर मुद्दामहून लोकं हटकत त्याला. अगत्यानं विचारपूस करीतं. उगाच पुढच्यामागच्या आठवणी उगाळत बसत. त्यांचं सगळंच बोलणं विजयला कळत नसे. त्याच्याशीं त्यांना खास शुद्ध भाषेंत बोलावं लागे. सर्वांना ती येत नव्हती. शिवाय हेलं काढून त्यांचं तें नाकांत बोलणं विजयला ऐकवत नसे. बस्स! गांवच्या लोकांविरुद्ध त्याची एकच तक्रार होती. त्यांनीं नाकांत बोलणं सोडून द्यावं. म्हणजे व्हायचं काय? त्याला उगाच वाटायचं आपण आपल्या लोकांत नाहीं. कुठंतरी आफ्रिकेच्या जंगलांत वावरतों आहोंत.

एक बाकी होतं! त्याला त्याच्या नांवानं हांक मारायला गांवांत लोकं तयार नव्हतीं. त्याला हें कससंच वाटे.

पहिल्या पहिल्यांदा त्यानं खूप सांगितलं. 'माझं नांव विजय-विजय शिर्के.'





अनुक्रमणिका

हट्! कोणीं ऐकूनच घेतलं नाहीं, म्हटलं, ' अरे दे ! आम्हांला तूं कमळीचा पोरच. '

' अहो, पण तें माझं नांव नाहीं. '

' नांव नाहीं ? मग ? ' लोकं विचारीत.

' नातं. ' विजय हंसून म्हणे.

लोकं कमी खट नव्हतीं. तीं थंडपणं सांगत, ' ह्या गांवांत नांवा-पेक्षां नातंच अधिक मानतों आम्ही. ध्यानांत ठेवायला सोपं. बापावरून पोरग ओळखावं हीच इकडची पद्धत ! आतां तुझ्या बाबतींत बापाचा प्रश्न नाहीं. म्हणून आयशीचं नांव घ्यायचं, काय ? '

चारवेळां अशी सणसणीत चपराक खाल्ली आणि तसा विजय सरळ आला. म्हणजे लोकं मुद्दाम त्याचा अपमान करण्याच्या हेतूनं बोलत नसत. पण त्याला मात्र शरमेनं मेल्यासारखं होई. चेहरा लालीलाल होई. काय बोलावं सुचत नसे. खालीं मान घालून बिचारा एकदाचा तिथून सटके.

बाकी इथं मामाकडे त्याचा वेळ मोठा मस्त जात होता.

घरांत ओटीवरच शाळा होती.

अण्णागुरुजीच्या शाळेचं एक वैशिष्ठ्य म्हणजे उन्हाळ्यांत सुद्धां शाळेला सुट्टी नव्हती. या मुद्यावर अण्णाचं मत बिलकूल ठाम होतं. या गांवांत उन्हाळा आहेच कुठं तर शाळा आणीक बंद ठेवायची ? झक मारतं तुमचं तें महाबळेश्वर अशी फर्स्ट क्लास हवा आहे इकडची ! काय ? त्या लोकल बोर्डापुढं गेलीं पांच वर्षं तो हेंच बोंबलून राहिला होता कीं बाबांनो शाळा मे महिन्यांत बंद ठेवूं नका. जूनमध्यें ठेवा. पावसाळ्याच्या सुरवातीला शेतीसाठीं लोकांना पोरांची गरज असते. शाळेला रजा असली कीं लोकांची ही अडचण भागेल. बरं, पोरांनाहीं प्रत्यक्ष शिक्षण मिळेल. पण बोर्डाला दूरदृष्टी आहेच कुठं ?

आल्याच्या दुसऱ्या दिवशीं. सकाळला.

' वंदन तुजला देवी शारदे ' या प्रार्थनेनं विजयला जाग आली. डोळे उघडून बघतो तर ओटीवर शाळा भरलेली. मध्यं बिछान्यावर तो झोपलेला. पोरं प्रार्थना म्हणत सभोंवती उभीं होतीं. पण प्रार्थनेकडे एकाचंहीं लक्ष नव्हतं. तीं बघत होतीं गुरुजींच्या या पाहुण्याला. कुतु-हलानं, उत्सुकतेनं खदखदत आणि फिदफिदत.

धडपडत विजय उठला. हंसत आंतल्या खोलींत गेला.

चुलीकडे बारातेरा वर्षांचं एक ताडमाड पोरगं उद्योगांत होतं.

' कोण रे तूं ?' विजयनं विचारलं.

' जी ! खुशाली मी ' त्यानं सांगितलं. चौथीच्या यत्तेंत आहे.'

' हा असला अभ्यास करतोस ?'

' गुरुजीच तर म्हणाले तूं घोंड्या आहेस, शिक्षण तुझ्यासाठीं नाहीं. माझं जेवणखाण बघ तूं. ' खुशालीनं खुलासा केला.

' म्हणजे गुरुजींचा आचारी आहेस म्हण कीं ! ' विजयनं विनोद केला.

खुशाली दांत काढून हंसला. ' होय; आचारीच नाहींतर काय !' मान हालवीत त्यानं रुबाबांत म्हटलं, ' कोंबडीच्या सागोतीपासून भट्टांच्या धावऱ्या वरणापर्यंत कोणतीही चीज बनवतां येते आपल्याला.'

' हो कां ? उत्तम ! पण गड्या, तूर्त एक कप चहा कर. '

' चा ?' अंगावर शहारा आणून खुशाली ओरडला, ' छा: ! दुसरं कांहीं बोला. '

' कां रे ! '

' माणसानं चा पिऊं नये प्रकृतीला वाईट. '

' अच्छा !'

' या देशाची नुकसानी चानं केली. '

' कोणी सांगितलं रे ?'

' गुरुजींनी खोटं असणं शक्यच नाहीं. '

' बरं बरं ! आधीं कर तर खरा.' विजयनं हंसून म्हटलं.

' करीन कसा ? इश्वेशपथ मला चा करतां येत नाहीं. ' अखेर खुशालीनं सांगून टाकलं.

चहापाणी आटपून विजय बाहेर आला तरी अण्णागुरुजींचा पत्ता नव्हता. ओटीवर पोरांचा मात्र कलकलाट चालला होता. कोणी कविता पाठ करीत होतं, कुणाची जोरजोरांत उजळणी चालली होती. कुणाला पाटीवर पाणी हवं झालं होतं. अर्थात बाकीच्यांना याचा त्रास झाला नसता तरच आश्चर्य ! आणि मग बोलाचाली, 'मी नाहीं, तूंच ' असले सवालजबाब, हमरीतुमरीवर येणं. टेबलावर काठी आपटत एक पोरगं उभं होतं. बहुदा हा मॉनिटर असावा पण त्याला कोणीही जुमा-नत नव्हतं. ' अन्त्या, माझं नांव टीप तर खरा मग सांगतो.' या अशा धमक्या त्याला मिळत आणि तोही निमूट त्या ऐकून घेत होता.

पोरांना जरा गप्प करण्यासाठीं विजय गुरुजींच्या खुर्चीवर जाऊन बसला. पोरं एकदम शांत झालीं. आंवढे गिळीत चिपचाप झाली. माना मोडत कावळ्याच्या नजरेनं विजयकडे तीं बघूं लागलीं. त्याला मापूं लागलीं.

एकवार त्यांच्यावरून नजर टाकली आणि विजयला हंसूं आवरेना. नाहींतरी तो धंदेवाईक गुरुजी नव्हताच !

पोरं याचीच वाट बघत होतीं. टाळ्या वाजवून त्यांनीं एकच गिल्ला केला, ' आज नवे गुरुजी, नवे गुरुजी.'

' मी कांहीं गुरुजी नाहीं.'

अंऽहंऽ ऽ ! तें कांहीं नाहीं ! तुम्हीच व्हा आमचे गुरुजी. किती छान दिसतां तुम्ही गुरुजी ! पोरं गाल फुगवून लाडीगोडी लावूं लागलीं.

' पण मला शिकवतां येत नाहीं.'

' चालेल ! नकाच शिकवूं. आम्ही अभ्यास घरीं करूं ' पोरांनीं जाब केला.

' मला पाढे येत नाहींत, कविता येत नाहींत, पदावली येत नाही.' विजय एक एक अडचण सांगूं लागला.

' आम्हीं शिकवूं. आम्हांला येतं-पाढे, कविता, पदावली-सगळंच्या सगळं. '

' एकोणतीस एके एकोणतीस, एकोणतीस दुणे अठ्ठावन्न–' एक पोरगं उभं राहून दणादण पाढे म्हणूं लागलं.

तें बघून एका चिमण्या पोरीला पण स्फूर्ति झाली. दोन्ही हातांनीं परकर सावरीत ती उभी राहिली. डुलत, खांदे हलवीत गोड आवाजांत कविता म्हणूं लागली–' उठाउठा चिऊताई; सारीकडे उजाडले.

डोळे तरी मिटलेले, अऽजूऽनीऽहीऽ !...

' शके, थोबाडींत देईन हां ! गप्प बैस.' त्या पोरऱ्यानं तिला धजावलं. तिनं जाब केला नाहीं. लक्षच नव्हतं. ती होती कविता म्हण ण्यांत दंग.





तसा तो पोरगा उखडला. मुठी वळवून शकूच्या अंगावर धावला. विजयचं लक्ष होतंच. हाताला धरून त्यानं त्या दांडगटाला मागं खेचलं. सांगितलं, ' मुलांना मी मारत नाहीं. नाहींतर तुलां चांगलाच ठोकला असता. '

' मारत नाहीं ?' पोरं आश्चर्यानं त्याच्याकडे बघत राहिली. हा कसला गुरुजी होणार, त्यांना वाटलं. त्यांच उत्साह उलट एकाएकीं थंडावला. न मारणारा गुरुजी त्या पोरांना तरी माहीत नव्हता. छे ! त्यांना ती कल्पनाच विचित्र वाटत होती. एक एकजण विचार करीत खालीं आपल्या जागेवर बसला.

पण खुशालीनं दारांतून सूचना केली, ' गुरुजी, मुलांना मारणं एकदम सोपं बघा. काठी घ्यायची अन् सपासप ओढायची. हातावर, पाठीवर–कुठंही ! मुळीं बघायचं कामच नाहीं,' काय ? झेपेल तुम्हांला ! प्रयत्न तर करा.'

'असं म्हणतोस. मग इकडे ये बघूं. तुझ्यापासूनच सुरवात करतों.' विजय हंसत म्हणाला.

खुशाली दारांत उभा रहातो कशाला ? तो आंत पळाला आणि तसा पोरांत एकच हंशा पिकला.

अपवाद एक. ती पोरटी. तिच्या कविता कांहीं संपत नव्हत्या. एक संपली कीं दुसरी–असं सारखं चाललं होतं. आजूबाजूची तिला शुद्ध नव्हती. अंमळ दम घ्यायला सवड नव्हती. घशाला कोरड पडली होती, शब्द फुटत नव्हते.

तिच्या चिकाटीचं विजयला मोठं कौतुक वाटलं. तिला जवळ बोलावून घेऊन त्यानं विचारलं, ' कोण ग तूं ?'

' शऽऽकूऽऽ ' धापा टाकत तिनं उत्तर दिलं.

' कोणाची शकू ?'

' माझ्या दादांची. '

' धर्म्या रुद्यांची पोर ती गुरुजी.' मध्येंच एकानं खुलासा केला.

' एक नंबरचा फटींग आहे हा धर्म्या. दारू पिण्याखेरीज दुसरा कसलाच धंदा करीत नाहीं.'

' हा खोटं बोलतो गुरुजी. ' शकूनं त्वेषानं सांगितलं, ' दादानं दारू सोडली. '

' हो का ? '

' होय. आयेनं दादाला शपथ घातली–माझी. तेव्हांपासून तो दारू नाहीं घेत. ' शकूनं मोठ्या अभिमानानं म्हटलं, ' पिईलच कसा ? मी मरेन ना ! गुरुजी, दादाचं माझ्यावर खूप प्रेम आहे हो ! ...'

ही अशी शाळा चालली होती तर अण्णागुरुजी घाईघाईनं बांहेरून आला. विजयला आपल्या खुर्चीवर बसलेला बघून म्हातारा खुष झाला. त्याचा वठलेला चेहरा फुलला. सुरकुत्या मावळल्या. हरखून अण्णागुरुजी म्हणाला, 'विजय, म्हणणारच होतों तुला कीं चार दिवस माझ्या शाळेकडे बघ. सध्यां माझं लक्ष एका महत्वाच्या कामांत गुंतलं आहे. अरे ती कंपनी येते आहे ना ? गांवांत लग्न, कुत्र्याला बोवाळ ! तशी माझी गत बेटा ! काय ? पण न सांगतांच मामाची अडचण तूं ओळखलीस. बरं झालं ! फर्स्ट क्लास झालं ! '

आणि हात उडवीत अण्णागुरुजी सरळ घरांत शिरला. ओरडूं लागला, ' खुशाली, खुशाली ! भांचोद् मेला कुठं पोर ? '

कंपनी आली तर मी सुद्धां तुमच्या शाळेकडे बघायला मोकळा रहाणार नाहीं, असं मामाला सांगायचं विजयच्या अगदीं तोंडावर आलं होतं. पण त्यानं स्वतःला आवरलं. बोलून गेलों आणि कांहीं झालंच नाहीं तर ? म्हणजे त्याला तशी खात्री नव्हती. त्याच्या मामान मात्र गांवभर डांगोरा पिटला असता. आणि मग हसं करून घेतलं असतं आपलं आणि या भाच्याचंही. त्यापेक्षां गप्प बसलेलं बरं ! त्यांतच शहाणपणा होता.

...झालं ! अण्णागुरुजीनं तर विजयला शाळेच्या दावणीलाच बांधून टाकलं.

आणि ही शाळा पुरे पडत नव्हती म्हणून कीं काय म्हातारा दाजी नावराच्या श्रीकांतला घेऊन आला. आतां आतेबाईला त्यान काय सांगितलं देवजाणं ! विजय शाळेंत मुलांना शिकवीत होता तर त्याला साद घालून अण्णानं म्हटलं, ' अरे विजय, हा तुझा नवा विद्यार्थी. '

' हा कोण ? ' विजयनं विचारलं.

' दाजी नावराचा चिरंजीव. याला दहावीत इंग्रजी शिकवायचं. अरे, हा कान्ता बृहस्पती आहे बेटा बृहस्पती ! पहिला येणार मॅट्रिकला, टिपून ठेव माझं भविष्य. या अण्णानंच धूळाक्षरं शिकवलीत म्हटलं.

' मॅट्रिक नाहीं. एस. एस. सी. अण्णा !' ' श्रीकांतन हळूंच सुचवलं.

अण्णा चिडला नाहीं. उलट अधिक कौतुकानं म्हणाला, ' ही अशी– अशी बुद्धी पाहिजे. काय ?'

' पण दाजी कां शिकवीत नाहींत याला ?' विजयचा अर्धवट प्रश्न.

' आणि मग गांवाला शिकवणार कोण ? तूं ? अरे, नशीब तुझं म्हणून असा बुद्धिमान विद्यार्थी मिळाला. चांगला तयार कर त्याला. काय ?'

' पण मामा—'

'आतेबाईचा हुकूम ! मानलाच पाहिजे. नाहींतर दोघांचीहि धडगत नाहीं बेटा. खरं कीं नाही रे कान्ता ?'

आतां यावर विजय काय बिशाद नाहीं म्हणेल !...

पण धर्म म्हणतां कर्म मागं लागतं म्हणतात ! आणि झालं तसंच ! म्हणजे त्याचं असं झालं, कमळीचा पोर श्रीकान्तला इंग्रजी शिकवतो हें बाळ्या नावराला कळलं वाटतं. कसं न् काय तें महत्वाचं नाहीं. आणि तसा आपल्या तिन्ही मुलांना घेऊन बाळ्या अण्णागुरुजीच्या दारावर उभा राहिला. बाहेर पायरीवरूनच ओरडला, ' अरे अण्णा—'

' काय रे ?' अण्णागुरुजीनं विचारलं. नशीब तो घरींच होता.

' तुझा भाचा त्या कान्त्याला इंग्रजी शिकवतो असं ऐकलं. '

' आणि तसं तुझ्या पोटांत दुखूं लागलं ?' म्हाताऱ्यानं प्रश्न केला.

' दुखणारच. वारस्याचा पोर माझ्या पोरापेक्षां हुषार होऊन नाहीं चालायचं. हीं माझीं तीन पोरं, तुझ्या भाच्याला म्हणावं कांत्याला जें शिकवतोस तेंच ह्यांना पण शिकवलं पाहिजे हां !'

आणि पोरांना वर ओटीवर लोटून बाळ्या नावर तरातर निघून गेला. तशी तासाभरानं मथीकाकू हजर झाली. बाबू नावर जिवंत नव्हता म्हणून नाहींतर तोच आला असता.

तिला बघून अण्णागुरुजीनं म्हटलं, ' काकू, तूं बरी बाहेर पडलीस ?'

' काय करणार ? त्याचा–थोरल्याचा आहे कांहीं उपयोग ?' काकूनं म्हटलं, ' अरे अण्णा, ही काय रीत झाली रे तुझी ? मी म्हणतें

...पान ४५ वर








तुमच्या पोटासाठीं चोऱ्या करतो. वाटल्यास शोभा शोभती. पण ही नोकरी करणार नाहीं—!

पण जेव्हां विद्येचा डॉक्टर होईन तेव्हा तुम्हापैकीं एकाच्या स्वर्गवासावर हे वर्तमानपत्रवाले लेख लिहितील, पण.. ज्या मानवानें ही सुंदर सृष्टी उभारली त्यानें आपल्या विश्ववैभव डोक्यावर ही घृणा वाहावी?...तशीं त्याला मूर्छा येऊन तो खाली कोसळला...!!






**परभूनें** मुलाच्या नोकरीसाठीं केलेल्या अर्जाला दोन वर्षांनीं उत्तर आलें तेव्हां तो मराया टेकला होता. अन् त्याचा मुलगा जय मॅट्रीकच्या वर्गांत शिकत होता. त्यानें आलेली भंग्याची नोकरी नाकारली तशी त्याच्या विरुद्ध घरांत नी बाहेर संतापाची लाट उसळली, अख्खी जात–जमात त्याच्यावर उलटली तरी तो आपल्या मताशीं दृढ होता. शिक्षण अधुरें सोडून भंगी व्हायला सांगणाऱ्या आई–बापांशीं तंडत होता. आतांही तो उरांत वैराचा वणवा घेवून बापाच्या खाटेपाशीं बापाच्या शब्दाची वाट पहात प्रहार करण्याच्या पवित्र्यांत ताठ उभा होता. शाळेंत नी वस्तींत भल्याभल्यांची भंबेरी उडविणाऱ्या आपल्या अमोघ शब्दसामर्थ्यानें मरावयास टेकलेल्या बापाच्या तुच्छ इच्छेचा धुव्वा उडवूं पहात होता.

आणि परभू खाटेवर निपचित पडून पायथ्याशीं उभ्या असलेल्या क्रुद्ध मुलाच्या मनाचा अंदाज घेत होता. त्याच्या डोक्यांतील पांढरपेशेपणाचें वेड घालविण्यासाठीं समर्पक शब्दांची जुळणी करीत होता. त्याची सोळा-सतरा वर्षांची सून शान्ती त्याचं पाय चेपीत बसली होती. डोईवरला पदर तिनें छातीपर्यंत ओढून घेतला होता आणि नेहमीप्रमाणें ती मनांतल्या मनांत नवऱ्यावर प्रखर प्रहार करीत होती. त्यानें शिक्षण सोडून तिचा आणि नोकरीचा स्वीकार करून संसार सांभाळावा असें








तळमळून सांगत होती. आणि तिची ही मनोव्यथा तिनें सासऱ्याच्या पायावर हात ठेवतांच त्याला जाणवली. तिच्या स्पर्शांतून सहास घेऊन त्यानें बोलायला सुरुवात केली–' जय!...'

आणि बापाला एक शब्दही बोलूं न देतां अंतरीच्या विद्रोहानें उग्र झालेला जय ओरडला—

' पिताजी, वाटेल तें झालें तरी मी शिक्षण सोडणार नाहीं, माझ्यावर लादलली ही भंग्याची नोकरी करणार नाहीं. उलट शिक्षण पुरें झाल्यावर सॉक्रीटीससारखा शहाणा झाल्यावर मी या अमानुष प्रथेचा–अस्पृश्यतेचा कराल काळ होवून नाश करणार आहे...'

त्याचें हें अग्निदिव्य उत्तर तीक्ष्ण तरवारीप्रमाणें त्या दोघांच्याही भावनांना टोचून गेलें.

मृत्युपंथाला लागलेल्या बापावर गुरासारखा ओरडणारा घरांतील दुःखदैन्य न ओळखणारा आणि तारुण्यप्राप्ती झाल्यापासून तिच्याकडे डोळा उघडूनहि न बघणारा जय तिला बेदर्द, बावळट आणि स्वार्थांध वाटूं लागला. ती धुंगटामधून त्याचेकडे पाहूं लागली. अन् त्याचें नेत्रदीपक शरीरसौंदर्य पाहून तिची नजर त्याच्यावर खिळून गेली. मनांत खळबळ झाली अन् मरणोन्मुख सासरा जवळ असतांना मनांत येवूं नये ते विचार मनांत येतांच शरमेनें चुर होवून पाय चेपूं लागली.

आणि सुनेची ही नम्र सेवा पाहून परभूला तिची कींव आली. आपल्या मरणानंतर या पोरक्या पोरीचे हाल होऊं नयेत, नवरा ढुंकून बघत नाहीं म्हणून कोणाच्या सांगीनें ती पापाच्या वाटेनें जावूं नये म्हणून मुलाला आलेल्या नोकरीचा अन् उपवर झालेल्या बायकोचा स्वीकार कराया लावलेंच पाहिजे असा निश्चय करून तो कठोरपणें म्हणाला,

' जय, तुला आपल्या घरांतील दैन्यदारिद्य, तुझ्या आईचे हाल दिसत नाहीत. तुझ्या बायकोचें दर्द तुला ऐकूं येत नाहीं.'

' केवळ यांकरतां मी भंगी होवूं ? शाळा, शिक्षण सोडून गांवाची घाण काढूं ? डोक्यावर मैला वाहूं ? मला भंगीच करायचें होतें तर तालीम दिली कशाला ? माझ्या मनांत ग्यानाचे, अभिमानाचें, माणुसकीचें दिवे पेटविले कशाला ? '

त्याच्या आर्तनादानें म्हाताऱ्याचें भडकलेलें मन पुनः सहानुभूतीनें ओलें होवूं लागलें, मुलाचें दुःख त्याला जाणवूं लागलें आणि शान्तीचें माथे त्याच्या तिरस्कारानें फुटूं लागलें. नवरा निकामी आहे हे विचार दृढ होवूं लागले. आपल्या नशिबाला दोष देत रडूं लागली. आणि विद्रोहानें प्रक्षुब्ध झालेल्या जयचंदानें आरोळी ठोकली—

' मी ती नोकरी करणार नाहीं! कदापी भंगी होणार नाहीं ! '

भंगी कामाबद्दलची त्याच्या अंतःकरणांतील सारी चीड, जुगुप्सा त्याच्या या नकारांतून वीज होवून कडाडून गेली होती. त्या आगीनें शान्ती जळून खाक झाली. म्हाताऱ्याच्या भावनांना झळ लागली. तरी त्यानें मुलाला कठोर वास्तवाची जाणीव करून दिलीच.

' पण तूं आहेस एका भंग्याचाच मुलगा! तुला ती कराया हरकत नाहीं.ती मिळावी म्हणून लोक शंभर शंभर रुपये भरतात. तुला ती फुकट मिळाली आहे...अन् तुझ्या नोकरीची आम्हांला गरज आहे. तू नोकरीला असतास तर माझा मृत्यु एवढा जवळ आला नसता, दमा असा बळावला नसता, कष्ट करकरून तुझ्या आईचा सांपळा झाला नसता...आणि या पोरीला वैन्याचा दिवस लोटावा लागला नसता...

' पण भंग्याच्या मुलानें भंग्याचीच नोकरी केली पाहिजे असें सांगितलें आहे कोणी ? '

' आपल्या दुःखानें, दैन्यानें धैर्यानें अन् देशानें ! '

' कोणता धर्म ? माणसाला मारून पशु करून टाकलें त्या धर्मानें ? माणसापेक्षां दगडाला महत्व दिलें त्या देशानें ? या देव, धर्म, देशाची ही आज्ञा मी एकायला तयार नाहीं. हें दैन्यदुःख यांनींच दिलें असल्यामुळें त्यांनाच गदगदा हालवून दूर काराया सांगितलें पाहिजे. अन् हें काम कराया मला शिकलें पाहिजे. तोंपर्यंत थांबा... '

'आणि अन्न अन्न करून मरून जा, नाहींतर पोटासाठीं पाप करा... ! '

' ज्यांना एवढाही धीर धरवत नसेल त्यांना करूं दे पोटासाठीं पाप ! '

हे नवऱ्याचे शब्द ऐकतांच शांतीच्या डोळ्यांतून झरणारीं आंसवें आटलीं. तिच्या चेहऱ्यावरला घुंगट दूर झाला असता तर कदाचित जयच्या बंडखोरीला भेग पडली असती. ती सासऱ्याच्या पायावर हात स्थिर ठेवून ताठ होवून धुंगटामधून नवऱ्याकडे रोखून पहात होती.

सुनेचा संताप पाहून आश्चर्यानें म्हातारा आनंदित झाला होता आणि मुलाचें भंगी कामाच्या तिरस्कारानें तीव्र झालेलें मन असेंच तापूं दिलें तर अपेक्षाभंगानें तो वेडा होईल अथवा आत्यंतिक निराशेनें जीव देईल हें उद्याचें भेसूर भविष्य दिसतांच तो एवढाही न भडकता समजुतीच्या सुरांत म्हणाला—

' दुसरी मिळेपर्यंत तरी ही धर. रात्रीची शाळा कर. पास झाल्यावर, दुसरी मिळाल्यावर ही सोडून दे.

करणार नाहीं. वाटल्यास शाळा सोडतो. तुमच्या पोटासाठीं चोऱ्या करतो. पण ही नोकरी करणार नाहीं !

' ते तुला भंगी काम देणार नाहींत. आपल्या मुकादमानें साहेबाला सांगितलें आहे. तुझ्या आईनें सर्व साहेबांचे पाय धरून बिनविलें आहे. जावून तरी बघ !'

'ते एकणार नाहींत. तो मोठा खिश्चनसाहेब खिश्चन असला, तो दुसरा मुसलमान असला तरी ते मनुला मानणारे आहेत. ते मला भंगीच मानतील. भंग्याचेंच काम देतील. मी शिकलेला आहे हें मानणार नाहींत. पिताजी शाळेंतही मला विद्यार्थी न मानता भंगी मानतात. भंगी मानून माझ्या हुशारीचें, ज्ञानाचें कौतुक करतात सर्वच. गांधीवादी अन् समाजवादीही. असा पावलापावलाला छळ करीत जगविणारा समाज, देश या दुनियेंत कुठेंच नाहीं. सहन तरी करूं किती ? गिळूं तरी किती ? हा देश आहे कीं माझ्यासारख्यांसाठीं कैदखाना ? मी कांहींही गुन्हा न कातां हें गुन्हेगाराचें यातनामय जीवन कां जगतो ? या नरकयातना कां भोगतो ? कां...कां ? '

मुलाचें हे कानाचें पडदे फाडणारे करालक्रंदन ऐकून म्हातारा रडूं लागला दुःखावेगानें थरथरूं लागला आणि बापाचे अश्रू आणि त्याच्या अंगाचा थरकांप पाहून जयचंद खालीं बसला. त्याची छाती चोळूं लागला, डोळे पुसूं लागला. त्याच्या स्वच्छ सुकुमार बोटांतील प्रेम पाहून म्हाताऱ्यानें त्याचें डोकें दोन्ही हातांनीं कवटाळून आपल्या छातीवर ठेवून ते तो कुरवाळूं लागला आणि गेल्या

— बाबूराव बागूल








चार-पांच वर्षांपासून घरांत असूनही मानसिक-दृष्ट्या एकाकी, अगतिक झालेला जय पितृ-प्रेमाचें सुख घेत डोकें तसेंच ठेवून बसला होता. उन्हांत जळणारे शेत जसें कोसळणारा पाऊस पिवून सुगंधूं लागतें, फुलूं लागतें, तसा तोही स्नेहस्निग्ध होवून सुगंधूं लागला. अपार जिव्हाळ्यानें आपलें सुखस्वप्न बापाला सांगूं लागला—

'पिताजी, ही परीक्षा पास झाल्यावर मी क्लार्कची नोकरी धरीन, कॉलेज करीन. विद्येचा डॉक्टर होईन. तुम्हां सर्वांना सुख-श्रीमंतींत ठेवीन. अन् जेव्हां तुम्हां दोघांपैकीं एकाला स्वर्गाची आज्ञा येईल त्यावेळीं वर्तमान पत्रवाले 'तुमच्यावर लेख लिहितील. तुमचा उल्लेख डॉ. जयचंद यांचे माता, पिताजी असा करतील...'

मुलगा चितारीत असलेलें नितांतसुंदर सुख-स्वप्न ग्रहन करण्याची, ऐकण्याची त्याच्या दुःखदारिद्र्यानें डागलेल्या अंतःकरणांत शक्ति नव्हती. तो अश्रूंनें भरलेले डोळे मिटवून मुलाचे डोळे उचंबळत्या वात्सल्यानें कुरवाळीत होता. गेल्या कांहीं वर्षांपासून दुराग्रहाच्या दगडाखालीं दबलेला प्रेमप्रवाह उंचबळूं लागला होता. आपला मुलगा आईतखाऊ बडबड्या नाहीं तर त्याचें आम्हां सर्वांवर प्रेम आहे, त्याचें अंतःकरण तेजानें, सद्गुणानें भरलेलें आहे. अशा रत्नाची शिक्षण पुरे करण्याची ही मागणी आपण पुरी करूं शकलों नाहीं, उलट त्याच्यावर तो भंग्याची नोकरी करत नाहीं म्हणून तुटून पडलों आहोंत याचें त्याला अनिवार दुःख होवूं लागलें. तो पश्चातापानें पुटपुटला—

तूं माझ्या-पोटीं, या देशी जन्माला यायला नको होतें तुझ्या उज्ज्वल आत्म्याचे फार हाल झाले. तुझें मी-बालपणीं लग्न केलें. बांधून टाकलें...पण तूं या गरीब पोरीचे, या सोन्या-सारख्या शान्तीचें नुकसान करूं नकोस. शिक्षण पुरें व्हावें म्हणून आज तिला दूर ठेवीत असलास तरी उद्यां तिला दूर ठेवूं नको...अन् तुझ्या आईशीं असा वागूं नको. तूं तिला रस्त्यावर कधीं आई म्हणून हांक मारीत नाहींस ? तिच्याबरोबर कुठें जात नाहींस, तुझ्यासारखा सुंदर सदृढ, शहाणा मुलगा आपल्या कामगार जोडीदारांना दाखविण्याची तिची किती इच्छा असते...पण तूं तिला रक्त-पिती माणसासारखा टाळतोस, तिला आई म्हणण्यास बावरतोस...तिचे काम, तिचे कपडे पाहून तुला लाज वाटतें...ती बिचारी या तुझ्या वागण्यानें रडत-कुथत असते. मनांतलें दुःख मनीं दाबीत असते. कधीं तें अति झाल्यावर मला किंवा या पोरीला तुला समजावया सांगतें...जय, तिला आईपण भोगूं दे... मरणाआधीं एवढें तरी सुख तिला घेवूं दे... तुझ्याशीं आईपणानें वागूं दे रे...'

आणि हें बापाचें वेदनाव्याकुळ बोलणें ऐकून त्याचे घारे डोळे अश्रूंनें भरून येवून झरूं लागले. बोलण्यासाठीं ओठ थरथरूं लागले. दाटलेल्या कंठांनीं तो बायकोच्या खांद्याला धरून म्हणाला–'खरं ग शान्ते !'

शान्तीनें लज्जेनें खालीं मान घातली. तिला तारुण्यप्राप्ती झाल्यापासून तो आजच तिच्याशीं बोलला होता. तिच्या अंगाला शिवला होता. त्यामुळें ती सुखावली होती. त्याच्याबाबत तिच्या ठायीं असलेली केवढी तरी चीड कमी झाली होती. आणि त्याच्या मनांत मात्र पश्चातापानें, फार मोठी उलथापालथ चालली होती. नितांत निराशेनें तो बोलूं लागला.

'कसली ही संस्कृती ? इथें मुलगा जन्म-देत्या आईला ती भंगी काम करते म्हणून तुच्छ लेखतो. तिचा द्वेष करतो. तिच्या हातचें अन्न खाया किळसतो...त्यांत माणुसकी ती काय !'

तो असा स्वतःशीच बोलत असतांना त्याची कानउघाडणी करण्यासाठीं रागातमांत आलेली भानी दारांत येवून उभी राहिली होती. आणि आश्चर्यानें थक्क होवून, राग संताप विसरून बापाच्या छातीवर डोकें ठेवून रडत असलेल्या मुलाकडे पहात होती. आई दारांत उभी असल्याचें जाणवतांच त्यानें अश्रूंनें भरलेली दृष्टी आईवर टाकली आणि भावनावेगानें उसळून उठून त्यानें तिच्या पायावर लोळण घेतली. तो तिच्या घाणीनें भरलेल्या पायावर तोंड घाशींत रडत म्हणत होता. माँ ! मला मुआफ कर...मला क्षमा कर...'

त्याच्या या पश्चातापदग्ध आक्रंदनानें ती गलबलून गेली होती. हादरून गेली होती. साबणानें स्वच्छ केलेल्या आपल्या हाताचें अन्न न खाणारा हा मुलगा आज आपले पाय कवटाळतो काय ? त्याचे मुके घेतो काय ? हें आहे तरी काय ? हा वेडा तर झाला नाहीं ना ? आणि हा संशय मनांत येतांच तिच्या काळजानें ठाव सोडला. ती भेदरून लटालटा कापूं लागली. बोलण्यासाठीं टाळ्याला अडकलेली जीभ सोडण्याचा प्रयत्न करूं लागली. आणि दुःखानें उन्मत्त झालेल्या जयला त्याच्या आईची स्थिति दिसतच नव्हती. मुलांचा पश्चाताप, दुःख बघून म्हातान्याच्या डोळ्याला धार लागली होती. आणि सासु खाली कोसळेल या काळजीनें हवालदिल झालेली शान्ती त्याच्या मिठींतून तिचे पाय सोडवूं पहात होती. सासूला आधार देण्यासाठीं जावूं पहात होतो. परंतु शरमेमुळें तिला पुढें जावबत नव्हते. आणि भानीचें भीतीनें भान हरपूं लागलें होतें. आणि सासूची ही अवस्था बघतांच शान्ती मोठें धाडस करून म्हणाली... ,जी, पडतील त्या...'

हें ऐकतांच त्यानें मिठी सोडली. तो उभा राहिला तशीं शान्तीनें शरमेच्या भारानें नम्र

## देवदूत [स्पॅनिश पद्यकथा]

जो देश जगाच्या नकाशावर नाहीं.
त्या देशांतील लोक
त्या शहरांतील चौकामध्यें उभे
राहून म्हणत होते
'हा मनुष्य मृत आहे'
पण माहीत नाहीं.
तो बँक-गिरण्यांची चिमणी-नक्षत्रं
आणि सोनेरी धूमकेतुवर
काबू मिळवूं इच्छितो
खरेदी करावंसं वाटतं त्याला
जे अलभ्य आहे-आकाश
आणि त्याला समजत नाहीं
स्वतः मृत आहे आपण
भूगर्भाचे कंप त्याच्या
भ्रुकुटिसमान आहे
खाणींत फुटणारा दगड
उन्मत्त प्रलाप-फावड्यानं
उकरल्याचा आवाज
हेच त्याचं श्रवण आहे
त्याच्या डोळ्यांत गॅसचा धूर आहे
त्याचं हृदय-खाणींतील स्फोट
डायनामाइट-उल्हासाचा सोट
तो खाणीच्या स्वप्नांत खरंच
मश्गुल आहे.

रफाएल आल्वर्ती
अनुवादक-जयवंत गुजर




होऊन पटकन् खाली मान घातली आणि त्यानें आईच्या कंबरेला हात घालून विनंती केली. चल आई...

'बेटा तूं जावूं नकोस शांतीला पाटवूं. बद्दूबद्दल विचारून पाहूं,' म्हातारा डोळे पुशीत म्हणाला.

'मग मला जेवण कोण करील...काम करून हात घाण झाल्यावर मला कोण भरवील.' आणि त्यानें आईला उचलून बाहेर आणून चालायला सुरवात केली. मुलगा आपल्यावर प्रेम करतो म्हणून आनंदलेली भानी 'कोण जेवण करील, कोण भरवील या वाक्यानें खिन्न झाली होती. ती मागे पाय ओढीत होती. तो तिला पुढें ओढीत नेत होता. अन् मुलगा केवळ आपण त्याच्या कोंवळ्या-स्वप्नमग्न अंतःकरणावर डागण्या दिल्यामुळें शहिदाच्या शौर्यानें हें दुर्दम्य धाडस कराया उठला आहे या जाणिवेनें म्हातारा तळमळूं लागला. भानी तर पार कोसळून गेली होती. त्याच्या आवेशपूर्ण संगती लोढण्यासारखी लडबडत चालली होती.

असें तें ऑफीसच्या अंगणांत येऊन उभें राहिले होते. कामाची वांटणी कामगारांना सांगत असलेल्या खिश्चन साहेबानें भानी बरोबर आलेल्या जयकडे पाहिलें अन् रोमन् शैलीतील सुंदर सशक्त तरुणासारखें त्याचें रुबाबदार रूप पाहून त्यानें मुकादमाला हांक मारली—'मुकादम !'

'जी साब !' साहेबाच्या सर्व भानगडींत चाटूची कामगिरी करीत असणाऱ्या मुकादमानें होकार भरला.

'इसको गाडी देव !'

'गाडी ?' मुकादम आणि मुकादमाच्या मागे सर्वच कामगार उद्गारले.

'हां. गाडीच ! त्याचा अर्ज मेहतराचा आहे.'

'गाडी ?' भानी हादरून गेली. अति चिडेनें आणि दुःख, अपमानानें तिला साहेबाची समजूत घालण्यासाठीं शब्द सांपडत नव्हते. ती साहेबाकडे नुसती 'आ' वासून पहात होती.

'मी नव्या माणसाची सुरवात गाडीपासूनच करतो !'

...'पण साहेब तो आंग्रेजी शिकलेला आहे...मेट्रीक...

'शिकूं दे. आहे मेहतर आणि आला आहे मेहतरीसाठीं जाव.' साहेबानें भानीचीं बोलणें बंद करून टाकण्यासाठीं चारमिनारचें सिग्रेट ओठांत धरलें. भंग्याचीं शिकलेलीं मुलें गरीबीपायी जरी कामाला आली तरी गाडीचें भयंकर किळसवाणें काम कराया धजत नाहींत. एक दिवसांत पळून जातात आणि अशा जागा साहेबाला चालवायला मिळतात. अशा दोन जागा साहेब चालवित होता. शंपाऊणशें घेवून तो तीनं चार महिन्यासाठीं एखाद्याला देत होता. आणि चार महिन्यानंतर दुसरी माणसें भरीत होता. आतांही ही तिसरी जागा आली होती. आणि ती साहेबानें स्वतःची मिळकत करून टाकली होती.

मुकादमा संगती उरीचें वादळ उरीं दाबून जय मुकाट्यानें चालला होता. त्याच्या मागें घळघळा रडत भानी चालली होती. आत्मताडनेनें तिला डवर चढूं लागला होता. वक्षा कोरडा पडूं लागला होता. साहेबाबद्दलचा सालासालाचा विरोध विद्रोह होवून तिच्या डोक्यांत धुमाकूळ घालीत होता. आपण मुलाचा घोर अपराध केला हा विचार चाबुक होवून तिच्या वात्सल्यानें भरलेल्या हृदयाला फटके मारीत होता. तिच्या डोळ्यातून अश्रूंचे सर सांडीत होता.

मुकादम आणि जय घाटकोपरच्या एका विभागांत आले. तो भाग मोठा तंग आहे. तिथें म्हशींचें गोठे आणि छोटे छोटे कारखाने खेटून वसलेले आहेत. तिथें लहानमोठ्या चाळीची आणि झोपड्यांची गर्दी आहे. अन् या अफाट लोकसंख्येचा सोय बत्तीस सडासाने केली आहे. त्या संडासाजवळ थाबून मुकादम म्हणाला—

'हें तुझें काम इथें गाडी येईल त्यावेळीं त्या संडासामधील बोळींत जावून संडासा खालचे डब्बे गाडींत ओतायचे, साफ करून ठेवायचे. वरचे संडास, या पायऱ्या आणि ही आजुबाजूची घाण काढायची. काम धड केलें नाहीं तरी नोकरी साहेबाच्या खिशात जाईल... आज तकलीफ होईल उद्या सुख येईल. जातो...' आणि मुकादम रुबाबात निघून गेला

जय तिथेंच उभा होता. मुकादमानें सांगितलेलें काम नुसतें ऐकूनच त्याच्या अंगाला जुगुप्सेनें काटा फुटला होता. अंतःकरणात विद्रोह उठला होता. तो ताठ उभा राहून सभोंवार बघत होता. संडासाच्या भोंवती लहान मुलांनी केलेली घाण पाहून त्याचें हृदय फुटूं लागलें होतें. डाकें धुंद होवूं लागलें होतें. अन् शरीर ताठरूं लागलें होतें.

संडासाकडे तोंड करून चिंतामग्न झालेल्या मुलाच्या पल्लेदार शरीरबांध्याकडे अश्रूनें भरलेले डोळे खिळवून, शरमेनें, संतापानें, आत्मनिंदेने विकल झालेली भानी मुलाजवळ येवून अपराध्यासारखी उभी राहून म्हणाली—

'बाळ, हें काम तूं करूं नको. घरीं जा. जा...' तिच्या शब्दातील टाहोनें त्याच्या हळुवार अंतःकरणात हुंदका जमूं लागला आणि आपल्यावरील तिच्या प्रेमाला पाहून सद्गदित होवून तो म्हणाला—'का ?

हें काम तुझ्यासारख्यासाठी नाही. हें आमच्यासारख्या अडाण्यासाठी आहे. ज्याचें मन, माथें, मान, नाक सडले नाहे त्याच्यासाठी आहे. तूं...तूं भंगी नाहींत...' तिनें रोखून धरलेले रडूं तिला पुढें बोलूं न देता फुटलें. तिचें वृद्धत्वानें विरळ झालेले गाल, ओठ, थरथरूं लागले. डोळे भरतीनें भरू लागले.

दिव्य दृष्टी !










अनुक्रमणिका

'आई, तुही लहानपणीं भंगी नव्हतीस... लग्न होईपर्यंत. हातांत झांडू धरीपर्यंत नव्हतीस... जें काम माझ्या माँ साठीं आहे तें...'

'नको, लेकरा असें बोलूं नको. असें मला खेटरानें मारूं नको. जा. नको आम्हाला अशी नोकरी. तुझ्या मुडद्यावर उभें राहून नको आम्हांला सुख. आराम. येवूं दे. आजच मला मरण येवूं दे. जा तुझ्या पाया पडते...' ती त्याचें मन वळविण्यासाठीं, आपण केलेल्या महा अपराधांतून सुटण्यासाठीं त्याच्या पाया पडायला खालीं वांकली. तशीं त्यानें पटकन् तिला छातीशीं धरून आवळली आणि त्याच्या डोळ्यांतून पाणी अन् गळ्यांतून हांक बाहेर पडली– माँ...'

ती त्याच्या कवेंत होती. उसळून येणाऱ्या हुंदक्यानें तिची जर्जर काया थरथरत होती. तिचा दुःखावेग पाहून त्यालाही रडूं येत होतें. पण सर्व शरीरांत उसळून उठलेल्या विद्रोहाच्या धगीनें तें जळून जात होतें. त्याचें विद्रोही मन धर्माशीं, देशाशी जोरजोरानें भांडत होते. आगडोंबांतील लाल ज्वालेंत पिवळी ज्वाला जशी मिळून थडाडत असते तसा तो आपल्या विद्रोही विचारांत विलीन होवून धगधगत असतांनाच मैला वाहून नेणारी गाडी येऊन थांबली. अन् गाडीवानानें हांक दिली–' भानी, तूं इकडे कशी ?'

तिनें वळून पाहिलें तसें ती आपल्या आधीं आंत शिरूं नये म्हणुन जयनें तिला झटकन सोडून दिलें नी पाठीला पाठ असलेल्या सोळा सोळा संडासाच्या मधील बोळीकडे तो धांवला. भराभर पायऱ्या उतरूं लागला.

' जय !' आत्यंतिक दुःखाची वेदना जेव्हां मनाच्या ठिकऱ्या उडवून देते तेव्हां जो रक्त गोठवून टाकणार चित्कार हृदयांतून उमटतो, तशींच तिची हांक होती. मुलाचा मृत्यु उघड्या डोळ्यानें पहाणाऱ्या असमर्थ मातेच्या मनाची समग्र वेदना त्यां हाकेंत होती. आईच्या अंतःकरणाचा झालेला जाळ त्याला जाणवला होता तरी तो तसाच भराभर उतरत एकदम तळाच्या पायरीवर जाऊन उभा राहिला. तसा बत्तीस संडासाच्या उग्र दुर्गंधीनें त्याचा गळा घोटला गेला. त्याचा जीव गुदमरूं लागला. डोळे गपकन् झांकले गेले. दुःखूं लागले. तप्त वाळूवर फेकलेल्या मासोळीसारखा मेंदु डोक्यांत तडफडतो आहे, रक्तवाहिन्यांचें जाळें तोडून, कवटी छिन्नभिन्न करून बाहेर पडतो आहे, पोटांत कोणी तरी रवि घालून जोरजोरानें घुसळतो आहे, अन् पोटांतील सर्व इंद्रियें तोंडावाटे बाहेर पडणार आहेत असें त्याला वाटूं लागलें. तसें त्यानें ओठ दाबून घेतले. थरथरत्या पायांत बळ ओतलें. अन् तो ताठ उभा राहिला. डोळे फाडफाडून बघूं लागला.

प्रत्येक संडासाच्या खालीं असलेल्या डब्या भोंवती कुठें किडे वळवळत होते, एकदोन








ठिकाणीं रक्तानें भरलेले कापडी, कापसाचे बोळे, बँडेज आणि रक्त पुवानें भरलेल्या पट्ट्या बघून जिगुप्सेनें त्याला हिंव भरल्यासारखें वाटूं लागलें. आपण आतां कोसळणार असें भासूं लागलें. कांहीं तरी भयंकर, विध्वंसक करावें असेंही त्याच्या मनांत येऊं लागलें. चक्रव्युहांत सांपडलेल्या अभिमन्यु समान त्याचें मन सहस्रावधी शत्रूंशीं लढूं लागलें. विचार करूं लागलें...... असा कोण माणसांचा, माणुसकीच्या महाद्वेषी शत्रु आहे कीं केवळ या देशांत जन्म घेतल्याच्या गुन्ह्यापायीं सबंध मानवकुळीं नरकांत डांबून टाकतो.... आणि हा देशही दांभिक कसा कीं कांहीं रुपड्यासांठीं–पोटासाठीं माणसांसारख्या माणसाला हें अत्यंत घृणास्पद काम कराया सांगतो...अन् माणुसही एवढा मुडद्या-सारखा कसा कीं दैन्यानें फाटलेल्या संसाराला टांके घालण्यासाठीं हें गलिच्छ काम करतो... मनुष्य !...ज्यानें अवघ्या विश्वाचें नामकरण केलें. देवधर्माला जन्मा घातलें, शून्यांतून सुंदर सृष्टी उभारली. मनुष्य...पंच भुता-पेक्षां प्रचंड, प्रभावी तो हें काम करतो. त्याच्या सूर्यासमान तेजस्वी, तपस्वी हातांनीं ती घाण वाहावी...? त्याच्या विश्ववैभव डोक्या-वरून न्यावी...? कां ? कां ? कोणत्या दैत्याला घाबरून ? कोणती महाभयंकर दारू पिवून...

ताज्या जखमेंतुन जसें रक्त वाहावें तसें त्याच्या आत्म्यांतून चिंतन झरत होतें आणि वर मैल्याच्या डब्याची वाट पाहून थकलेला घाईत असलेला गाडीवान ओरडला—

' अरे तूं आंत झोपला आहेस काय ? बेट्या, मला अख्या गांवची घाण गोळा करायची आहे. आण. लवकर आण...! भंगीचा बच्च्या असून घाबरतोस ?

वरून ओरडणाऱ्या गाडीवानाकडे त्यानें मागें वळून पाहिले त्याचे पानानें रंगलेले. ओठ आणि त्यावरील वंसू पाहून जयच्या तळ-पायाची आग मस्तकाला गेली. घाणीबद्दल घृणा न वाटणाऱ्या त्या गाडीवानाबद्दल त्याची चीड वाटूं लागली.

मुलगा आंत विचार करीत उभा असल्याचें ऐकून शरमेने दुःखानें, दगडाच्या पुतळी-सारखी जड झालेली भानी मण मण वजनाचे पाय हळूहळू उचलीत बोळा जवळ येऊन आत्मक्लेशानें अजून खतम न केलेली सर्व शक्ति उपयोगांत आणून ओरडली– 'बाळा, जय वर ये...'

आणि उभें रहाण्याची शक्ति एका हाकेनें संपल्यामुळें धडकन् खालीं कोसळली. ती खाली आपणाला मदत कराया येवूं नये म्हणून जयनें झटकन् पुंढें होऊन जवळच्या संडासांतील डब्याला फरकन ओढलें तशीं त्याचीं बोटें पचकन भरली. त्यामुळें त्याच्या अंगावर काटे फुटले. मन घृणेनें फटकन् फाटलें तरी त्यानें आवेषांत डब्बा उचलून खांद्यावर घेतला आणि या त्याच्या आंधळ्या आवेगानें डब्बा डचमळला. अंगावर घाण बद्बद करीत सांडूं लागली. सापानें पायाला विळखे कसायंलां सुरुवात केल्यावर माणूस जशी जिवाच्या आकांतानें आरोळी ठोकतो तशी त्यानें आरोळी ठोकली– ' आई !'

त्याची आरोळी ऐकून भानीला सांवरून बसवित असलेला गाडीवान खालीं वाकून पाहूं लागला. नरकानें उभा भरलेल्या जयकडे पाहून किळसेनें सहारत म्हणाला–' अडाणी बेवकुफ !'

आणि हें ऐकतांच आधींच त्याच्या देहाला असह्य झालेला विद्रोह विध्वंसक होवून उचं-बळूं लागला. सुडाडलेल्या संतप्त सर्पासारखा तो गाडीवानाला लक्ष करून वेगानें वर येत होता. रागानें, घृणेनें, आत्मपिडेनें, बेभान झाल्यामुळें अंगावर सांडत असलेल्या घाणीची त्याला शुद्धही नव्हती. वर येतांच प्रेताप्रमाणें पांढरी फटफटीत पडलेली, घामानें चिंब झालेली आई बघतांच त्याचें काळीज दुभंगून गेलें. आणि तिला बघण्यासाठीं तो गाडीवाना-कडे खांद्यावरला डब्बा करून म्हणाला— ' धर... '

' जा टाक. तुझें काम तूं कर. मात्र तिलाही तुझ्याप्रमाणें गू–घाण करूं नको. सुव...'

त्याच्या शब्दांतील तुच्छतेनें डोळ्यांतील निर्भत्सतेनें आणि त्यानें हांसडलेल्या शिवीनें जयच्या रंध्रारंध्रांत खदखदणाऱ्या विद्रोहानें त्याला आंधळ्या आवेषाच्या हवाली केलें. त्यानें हात जातील तिकडे डब्बा भिरकावून दिला. अन् गाडीवानाला आपल्या अंगावर ओढून घेऊन हाणायला सुरुवात केली. 'मला शिकवितोस...माझ्या दुःखावर डागण्यां देतोस...मला तुच्छ लेखतोस...मला...' असें म्हणत तो पावसाच्या धारेच्या गंदींने हात पडेल तिथें त्याला हाणीत होता. उधाणलेला समुद्र जसा मचव्याला झिंजाडून झिंजाडून उध्वस्त करतो तसा तो त्याला करीत होता.

आणि गाडीवान जीव वाचविण्यासाठीं ओरडत होता–' बचाव ! '

म्हशीच्या गोठ्यांतील चाकर हातांत दण्डे घेवून धांवत येत होते. आजुबाजूच्या चाळीं-तील लोक बाहेर पडले होते. त्यांच्या भोंवती जमले होते. पण दोन माणसांची–मेहतरांची जीवघेवूं झुंज कोणी रोखीत नव्हतें. विटाळ होऊं नये म्हणून म्हैशीचे चाकर हातांतील दंडे हातांत घेवून तसेंच उभे होते. अन् अवघ्या गांवाची घाण अंगाला लागूं नये म्हणून वाकीचे लोक मधीं पडत नव्हते. अन् ते दोघेही एकमेकांचा जीवघेण्याच्या ईर्षेने झगडत होते.

आणि भेदरलेली भानी मांजरीसारखी रडत ओरडत त्यांच्या भोंवती फिरत होती. जम-लेल्या लोकांना ती झुंज सोडविण्यासाठीं विन-वित होती पण कोणी तिला मदत करीत नव्हतें. जेव्हां जयच्या अंगांतील आवेष ओसरला, गाडीवान खाली कोसळला त्यावेळीं आईच्या गळ्यांत पडून जय ओरडला होता.–

' माँ ! हीं माझीं बोटें कांपून टाक... हे हात तोडून टाक...अंग कुटून टाक ! मला मारून टाक ! '

अंगावर रॉकेल ओतून घेऊन पेटलेला माणूस जळूं होरपळूं लागला म्हणजे जसें हृदय-भेदक आर्तक्रंदन करतो तसा त्याचा आवाज होता. तिचें हृदय भांग भांग चिरीत होता. आणि मुलगा वेडा झाला कीं काय या धसक्यानें त्याच्या आर्त आरोळ्यानें तिच्या शरीरांतील सावधानता, शक्ति उडून गेली आणि ती खालीं कोसळली.

ती खाली कोसळतांच त्याची ओरड थांबली. त्याच्या मनाला मूर्च्छा येऊं लागली. मदत प्रथम कोणाला करावी हें त्याला सुचत नव्हतें. गाडीवानाला आपण अन्यायानें, आंधळे-पणानें मारलें हें त्याला जाणवूं लागलें होतें. त्याच्याबद्दल सहानुभूती आणि शरम त्याला वाटूं लागली होती. आईवर आणि गाडीवाना-वर त्याची लजीत लाच्छीत नजर फिरत होती. समोरील गर्दी पाहून त्याची मान खाली गेली होती.

आजुबाजूचीं माणसें उभींच होतीं. जयच्या उध्वस्त झालेल्या अंतःकरणाची कोणालाच प्रचिती येत नव्हती. येवूं शकतही नव्हती. कारण त्यांचीं मतें मागेच मनूनें मारून टाकलेलीं होतीं.

• • •






अनुक्रमणिका

*संत साहित्यांत आढळणारी आणि संतांच्या विविध हालचालींतून व्यक्त झालेली अभिनय छटा या लेखांत गवसेल व संत संगतींचा आनंदहीं मिळवून देईल, असा हा लेख.....*



# संत–साहित्यांतील नट-नाट्य



—प्रा. मा. श्री. परांजपे
(एम्. ए.)

महाराष्ट्रांतील संतकवि हे भगवद्भक्त होते आणि भगवत्सेवा हेंच त्यांच्या जीवनाचें परम साध्य होतें. यामुळेंच साहित्याविषयीं किंवा कलेविषयीं बोलतांना 'कळाचि विकला होती नेणता जगजीवना' अशी त्यांची दृष्टी असावी हें साहाजिकच आहे. याच दृष्टीनें या संत कवींनीं आपल्या काळांतील लोकरंजक हरिदासांना उद्देशून 'राजमान्य श्रेष्ठ नाना अधिकारीः त्यापुढें कुसरी दाविताती' 'नटया होऊनिया डोळे मोडीः मज्यालसीपुढें' 'हरिदास्य सांडूनि कळावंत जाले' असे उद्गार काढलेले दिसतात.

पण गंमत अशी कीं लोकरंजक हरिदासांचा व त्यांच्या कलाकुसरीचा संतकवींनीं एकजात निषेध केला असला तरी या कलाकुसरीचें त्यांना मुळांत वावडें आहे असें मात्र दिसत नाहीं. याचें एक कारण म्हणजे ज्याच्या प्राप्तीची आस्था त्यांना वाटते त्या गिरिधारी भगवंताचें नटनाटकपण ते जाणून आहेत आणि अशा नाटकी गिरीधराच्या प्रसंग असल्यामुळें नटनाट्याचाहि त्यांना चांगला परिचय आहे. 'प्रेमळ गीत तुम्हांला हरि, हरिणापरिस बहुत वश करते' किंवा 'प्रेमाचे नि छंदें विठ्ठल नाचूं लागला' या संतकवींच्या उद्गारावरून भगवंतांची गानलुब्धता आणि नृत्यलीला त्यांच्या कशी परिचयाची आहे तें कळेल.

पण भगवंताचीच गोष्ट कशाला, खुद्द या प्रेमळांचीच अवस्था भगवद्भक्तीच्या रंगांत कशी होते ते भागवतांतील बाल प्रल्हादाच्या वा इतर भक्तांच्या 'नृत्यंति गायन्ति' या गोष्टीवरून कळून येत नाहीं काय ? आपल्या तंत्रीवर सुमधुर गायन करून भगवंतास प्रसन्न करूं पाहणाऱ्या देवर्षि नारदाचें कौतुक प्रत्यक्ष शुक्राचार्यांनीच गाइलेलें नाहीं काय ? रासक्रीडेच्यावेळीं भगवान् अंतर्धान पावले तेव्हां विरही गोपिकांनीं यमुनेच्या वाळवंटांत भगवत्लीलांचा जो अभिनय केला त्यामुळेंच प्रसन्न होऊन भगवंतांनीं त्यांना पुनः दर्शन दिलेलें नाहीं काय ? विरहाच्या काळांत आधार देणारा, प्रियजनांच्या प्रसन्नतेला कारण होणारा आणि त्यांच्या स्मरणानें साऱ्या अंगोपांगांना उल्हसित करून सोडणारा हा नटनाट्याचा प्रकार भक्तिरसाला पोषकच ठरलेला नाहीं काय ?

आणि बहुधा ही गोष्ट लक्षांत घेऊनच ह्या प्रेमळ भक्तवृंदानें आपल्या प्रियोत्तमाला वश करण्यासाठीं ह्या नृत्यगीताभिनयादि कलांचा निःसंकोचपणें स्वीकार केला. बंगालचे प्रसिद्ध भक्त महाप्रभु गौरांग, गुजरातचे नरसी मेहता, राजस्थानची मीरा आणि मथुरेचे सूरदास ह्या साऱ्या साधुसंतांनीं ह्या कलाचें साह्य घेऊन आपली भक्तिसाधना पुष्ट केली. भारतवर्षांतील ह्या इतर साधुसंतांप्रमाणें महाराष्ट्रांतहि संत ज्ञानेश्वरांपासून रामदासांपर्यंतच्या संतांनीहि आपल्या भक्तिसाधनेला नटनाट्यांची जोड दिली. महाराष्ट्राच्या भक्तिसाधनेंत नृत्य–गीत–अभिनयादि कलांना वाव मिळवून देण्यास ह्या संतकवींनीं जें साह्य केलें तें महाराष्ट्राच्या कलासाधनेलाहि कौतुकास्पद वाटावें असेंच आहे.

### ज्ञानेश्वरांचा 'नट नाच'

मराठींतील 'नटनाट्या'चा पहिला उल्लेख मुकुंदराज आणि ज्ञानेश्वर ह्या दोघांच्याहि ग्रंथांत आढळतो. फरक इतकाच की मुकुंदराज

अनुक्रमणिका

सगुणभक्तीच्या विवेचनांतच पण दृष्टांताच्या स्वरूपांत तो करतात तर ज्ञानेश्वर भगवद्भक्तांच्या कीर्तनांतील एक डौलदार अंग म्हणून करतात. दुसरी महत्वाची गोष्ट अशी कीं ज्ञानेश्वर 'नटनाच्या' ऐवजीं 'नटनाच' असा शब्द वापरतात. 'नटनाच' या शब्दाचें 'नटाप्रमाणें नाच', 'नटाचा नाच' किंवा 'नटणें आणि नाचणें' असें तिन्ही अर्थ संभवतात. परंतु ज्ञानेश्वरांनीं केलेल्या उल्लेखाचें स्वरूप पाहतां पहिलाच अर्थ जास्त समर्पक वाटतो. देवालयांत देवापुढें कान धरून रंगशिलेवर नाचण्याची वैयक्तिक प्रथा फार जुनी आहे. ज्ञानेश्वरांच्या काळांत ती सामुदायिक स्वरूपाची आणि वैष्णवांच्या कीर्तन परंपरेंतील एक रूढ झालेली प्रथा दिसते. गीताभाष्याच्या आपल्या नवव्या अध्यायांत 'सततं कीर्तयन्तो माम्' या श्लोकांतील 'कीर्तयन्तः' या पदाचें विवरण करतांना ज्ञानेश्वर लिहितात—

तरी कीर्तनाचे नि नटनाचें नाशिले व्यवसाय प्रायश्चित्ताचें
तें नामचि नाहीं पापाचें ऐसे केलें ॥
राया रंका पाड धरूं नेणती सानेया थोरा कडसणी करूं
एकसरें आनंदाचें आवारूं होत जगा ॥

भावावेशांत वक्ता नृत्य करूं लागला म्हणजे श्रोत्यांच्या आनंदाला डोल येऊन तेहि कसे नाचूं लागतात याचीं वर्णनें गौरांगचैतन्य आणि रामकृष्ण परमहंस यांच्या चरित्रांत आढळतात. या भावावेशांतील नृत्योन्मादालाच ज्ञानेश्वर 'नाटनाच' म्हणतांना दिसतात.

ज्ञानेश्वरांच्या काळांत कीर्तनांतील डौलदार आणि कलाकुसरीचा भाग कोणता असेल तर तो 'नटनाच' म्हणजे नृत्य हाच होय. त्यांच्या समकालीन अभंगकवींच्या काव्यांतहि इतर कलांपेक्षां नृत्याचाच उल्लेख विशेष आढळतो. नामदेवांच्या कीर्तन प्रसंगांचें जनाबाईनें जें वर्णन केलें आहे त्यांत 'अभंग बोलता रंग कीर्तनीं भरला : प्रेमाचेनि छंदें विठ्ठल नाचूं लागला' असें विठ्ठलाच्या नृत्याचें वर्णन आहे. स्वतः जनाबाईहि आपल्या कीर्तनाच्या आरंभीं विठाई माउलीला आमंत्रण देते तें 'माझिया रंगणीं नाचावें' यासाठींच. तुकारामांनीं कीर्तनाच्या शेवटीं वरयाचना करतांना 'देवाद्वारीं मी निःशंक नाचावें' अशी मागणी केलेली आहे तर रामदासांनीं कीर्तनांत रंग कशानें येतो हें सांगतांना 'हरिदास नाचती रंगीं' असें एक कारण दिलेलें आहे.

एकंदरींत ज्ञानेश्वरांपासून रामदासांपर्यंतच्या साऱ्याच संतांनीं 'नृत्य कलेचा' उल्लेख केलेला असून हरिकीर्तनाचें तें एक वैशिष्ट्यपूर्ण अंग असा त्यासंबंधीं आपला अभिप्रायहि व्यक्त केलेला आढळतो. त्यांतील 'नाच' या शब्दानें बिचकून जाण्याचें कारण नाहीं. आजच्या काळांत रंजनाकरतां केलें जाणारें स्त्रीवेषधान्यांचें वा नृत्यांगनांचें नृत्य म्हणजेच नाच असें आपण मानतो. पण या संतकवींना हवा असलेला नाच याहून वेगळ्या स्वरूपाचा आहे. तो देवाला रंगविण्यासाठीं देवापुढें उभा राहून करावयाचा असून त्यांत श्रोत्यांनेंहि बघ्याची भूमिका न घेतां त्यांत सामील व्हावयाचें आहे.

**'सोंगें आणि' 'हावभाव'**

ज्ञानेश्वर–नामदेवांच्या काळांतील नटनाचाला एकनाथांच्या काळांत एक महत्वाची जोड मिळाली आणि ती म्हणजे सोंगाची होय. एकनाथापूर्वीच्या ग्रंथकारांनीं सोंगें घेणाऱ्या बहुरूप्यांचा उल्लेख केलेला असला तरी तशीं सोंगें घेण्याबद्दल स्पष्ट उपदेश कुठेंच केलेला नाहीं. एकनाथांचें वैशिष्ट्य हें कीं त्यांनीं भगवान श्रीकृष्णाच्या मुखानें याविषयीं स्पष्टच सूचना दिलेली आढळते.

गोपाळकाल्याचा विन्यास रासक्रीडेचा हव्यास
गोपाळ वेषाचा विलास मनोहर वेष दावावा ॥
वानावी देवाची वाढीव करावी देवाची भाटीव
ऐसे दावूनि हावभाव महामहोत्सव करावा ॥

ह्या ओव्यांतील 'मनोहर वेष' आणि 'हावभाव' हे दोन उल्लेख लक्षांत ठेवण्यासारखे आहेत. एकनाथ एवढी सूचना देऊनच थांबले नाहींत तर सोंगांना वाव मिळावा म्हणून देवाच्या दरबारांत दान आणण्याचा ललिताचा नवा प्रकार त्यांनीं कीर्तनाला जोडला आणि सोंगें तरी इतकीं विविध आणलीं कीं 'रात्र थोडी सोंगें उरलीं फार' असें त्या सोंगांनाच म्हणण्याची पाळी आली. ललिताच्या प्रकारासाठीं जशीं त्यांनीं सोंगें सजविलीं तद्वतच वेशांतराच्या नाट्यकथाहि नव्यानें लिहिल्या आणि 'डोळे मोडित राधा चाले' अशा स्वरूपाचीं अंगविक्षेपाची सूचना देणारीं अभिनयगीतेंहि रचलीं. लोकांना वेध लावण्यासाठीं कीर्तनांत परोपरीचा विनोद आणू पाहणारा एकनाथांसारखा हौशी कवि मराठींत दुसरा क्वचितच आढळेल.

**'अभिनय' आणि 'गीत'**

पण अभिनय करावयाच्या सूचना देणें वेगळं आणि तो अभिनय आपोआप होणें हें वेगळें! कीर्तन प्रसंगीं प्रेमाच्या भरांत तल्लीन होऊन अभिनय करणाऱ्या हरिदासाचें वर्णन एकनाथांच्या काव्यांत आढळत नाहीं. वामनपंडितांनीं मात्र आपल्या एका काव्यांत अशा एका हरिदासाचें दर्शन आम्हांस घडविलें आहे. हरिदास कीर्तनाच्या रंगांत स्वतः रंगला, भगवंताच्या अवतारकथा सांगतांना तल्लीन झाला म्हणजे त्याच्या अंगोपांगांतून कलात्मकता प्रगट होते त्याचें वामनांनीं केलेलें हें वर्णन पहा :—

कीर्तनांत हरिदास करीती विष्णुच्या विविध कौतुक रीती।
मानसीं हरिविलासमयांत रामता प्रकट त्या समयांत ॥
श्रीरामरूपीं शरचाप हातीं हा भाव गाती हरिचा पहाती।
ते दाविती श्रीहरिदास ठाणें प्रेमें मनाचीं उठतां उठाणें ॥
गोपरूप हरि हृत्सदनांत प्रेम गानरस तो वदनांत।
बुद्धि तन्मयपणास धरीते वेणु दावित तई अधरीं ते ॥
प्रेमविव्हळ असावध रीती विष्णुचे विविध भाव धरीती।
नाचती विविध ते हरिदास त्याहुनी सकळ लाज उदास ॥

ज्या प्रेमळ हरिदासाचें वर्णन वामन करीत आहेत तो भगवंताच्या कथा सांगण्यांत किती तल्लीन झाला आहे तें पाहण्यासारखें आहे. या तल्लीनपणामुळेंच तो निःशंक रीतीनें देवाच्या लीला स्वतःच अभिनय करून दाखवीत आहे. त्या तन्मय वृत्तीमुळेंच तो कधीं श्रीराम चंद्राप्रमाणें हातांत चाप धरण्याचें अवसान दाखवतो तर कधीं वेणु अधरावर ठेवून वाजविल्याचा आविर्भाव करतो.

वामनांच्या या हरिदास वर्णनांत अभिनयाबरोबरच गीत आणि नृत्य या दोन्हींचा उल्लेख आहे तो लक्षणीय आहे. ज्ञानेश्वरांच्या काळांतल्या 'नाचा' बरोबर 'अभिनय' तर आहेच पण 'गायन'हि सुरू आहे. नृत्य, गीत आणि अभिनय या तिन्ही कलांचें समन्वयानें एकत्रित दर्शन या ठिकाणीं होतें ही गोष्ट विशेष महत्वाची होय.

**'धन्य चतुरंग कला'**

पण लोकांच्या मनाला भक्तीचा वेध लावण्यासाठीं कला साधनांचा चतुरस्रतेनें उपयोग करून घेणारा आणि त्या वेधक कलागुणांचा

साक्षेपानें विचार करणारा संतकवि मात्र रामदासाशिवाय दुसरा आढळत नाहीं. प्राचीन मराठी संतपरंपरेंतील साध्या रसाळ हरिकीर्तनाला 'संगीत कीर्तनाचें रूप देऊन त्यांत जास्त रंग आणण्याचें काम समर्थ रामदासांइतकें कुणीं केलेलें नाहीं. आपल्या पूर्वींच्या संतकवींनीं उपयोगांत आणलेल्या नृत्य व नाट्य यांचा तर त्यांनीं विचार केलाच पण त्याबरोबरच वादन आणि गायन या दोन कलांची त्यांनी कथाकीर्तनाला जोड दिली. 'धन्य चतुरंग कला' अशा शब्दांत या चारहि कलांची त्यांनीं प्रशंसा केलेली आहे.

नृत्य व नाट्य या कलांच्या बाबतींतहि समर्थांनीं जुन्या कवींनीं आणलेलें नटनाच व सोंगें लक्षांत तर घेतलीच पण आपल्या काळांतील या क्षेत्रांत होऊं पाहणारा बदलहि विचारांत घेतला आहे. कर्नाटकांतील देवस्थानांत महोत्सवाच्या निमित्तानें होणारीं नाटकें व नृत्यें त्यांनीं पाहिलेलीं आहेत. 'रसाला कळा लाघवें नाटकाची' पाहून आपलें मन थक्कित झाल्याचा निर्वाळाहि दिला आहे. या नाटकांत आरंभीं नाचत येणाऱ्या गणेशाच्या पात्राचा उल्लेखहि 'प्रगटत नटवेषें गणाधिप' या पदांत त्यांनीं केलेला आढळतो. गणेशाच्या नृत्याचीं आपल्या पदांत आणि इतरत्रहि त्यांनीं जी वर्णनें केलीं आहेत ती एखाद्या कुशल नर्तकाचें नृत्य डोळ्यापुढें उभीं करतील अशीं आहेत. परंतु नृत्याचें असें कौतुक करतांनाहि त्यांत बोचणाऱ्या उणिवांचीहि खडसून परामर्श घ्यावयाला ते चुकत नाहीं. एखाद्या नृत्यांगनेच्या व गायिकेच्या सौंदर्याच्या भांडवलावर नृत्याचें वाटेल तसें प्रदर्शन करणाऱ्या मथुरेच्या नंदलालाला 'तरी ताली न्युकि रे नंदलाला' असें त्यांनीं बजावलेलें दिसतें.


युद्धजन्य प्रेम !

## समर्थांचीं 'संगीत' कीर्तनें : वादनाची जोड

समर्थांच्या काव्यांतील वादनकलेचा निर्देश हा पूर्वींच्या संतकवींनीं न उल्लेखिलेला असा एक नवा विचार म्हणावा लागेल. कीर्तनांत रंग आणण्याच्या दृष्टीनें ताळमृदंग आणि वीणा यासारख्या वाद्यांचा किती उपयोग होतो हें समर्थांनीं कितीतरी पदांतून स्पष्ट केलेलें आहे. 'वोळला रे रंग वोळला रे : ताळमृदांगें भव्य कल्लोळला रे' ह्या त्यांच्या पदांत वाद्यघोषानें कीर्तनाला कसें अनुकूल वातावरण तयार होतें याचें चित्र आपणास पाहावयाला मिळतें. असें संगीत कीर्तन समर्थांचें किती आवडतें आहे तें त्यांच्याच शब्दांत पाहा :—

ताळ मृदंगाची ध्वनी निल आठवते मनीं
सुख पाहो जातां जनी अखंड दिसत नाहीं ॥
सफळ तोचि तो दिन संगीत कथाकीर्तन
तेणे रिझे माझें मन आनंदसूत्र ऐकता ॥

ज्ञानेश्वरापासून एकनाथ-वामनापर्यंतचें कीर्तन हें समर्थांच्या आवडीनुसार संगीत कीर्तनांत रूपांतर पावलें आहे हें लक्षांत घेतलं म्हणजे कलात्मक साधनांनीं हरिकीर्तनाला त्या समर्थांनीं कसें पुष्ट केलें तें कळतें.

पण या साऱ्या 'चतुरंग कळां'तहि समर्थांची आवडती कला कोणती असेल तर ती 'संगीत कला' ही होय. समर्थांचें संगीतप्रेम प्रसिद्धच आहे. एरवी निस्पृहपणें वागणाऱ्या रामदासांनीं आपल्या महंत शिष्यांना 'गायन कलेचा' अभ्यास ठेवण्याचा परोपरीनें उपदेश केला; संप्रदायांतहि 'गाण्या-वाजवण्याला' एक महत्त्वाचें लक्षण म्हणून स्थान दिले आणि प्रभु रामचंद्राजवळ वरयाचना करतांना 'संगीत गाणें दे रे रामा' अशी मागणी करावयास ते विसरले नाहींत. संगीताचा जनमनावर होणाऱ्या प्रभावाचेंहि किती परोपरीनें त्यांनीं वर्णन केलं आहे तें पाहण्यासारखें आहे. 'सुंदर गायन तेथें रंगलें मन' 'पुण्य परायण सुंदर गायन विसरवी देहभावा' 'धन्य लीला गायनी कला एकमेकां जीवीं जिव्हाळा' अशा पदांतून संगीतानें येणारा डोल सांगतांनाच संगीतामुळें आशयाला गोडी चढते हाहि मुद्दा त्यांनीं नेहमी लक्षांत घेतलेला दिसतो.

## नाट्यसंगीतासंबंधीं एक महत्वाचा विचार

याहूनहि आणखी एक महत्वाचा आणि कांहींसा मूलगामी स्वरूपाचा एक नवा विचार संगीताच्याबाबतींत समर्थांनीं मांडला आहे तो आजकाल नाट्यसंगीताच्या क्षेत्रांत ऐकूं येणाऱ्या विचारांशीं फार जवळचा आहे; व तो म्हणजे 'शब्दांचा खरा अर्थ व्यक्त करणें हें गायनाचें अंतिम ध्येय असावें,' हा होय. एका गायकाला उद्देशून केलेल्या विनंतींत समर्थ म्हणतात—

मज मानत नाही तनाना
अर्थप्रबंद कांहो म्हणाना
अर्थ घन स्वर पोचट
अर्थेंविण शब्दची फलकट

'गीतांतील आशयाला स्वरालापाची वा तालबाजीची बाधा होऊं नये' ही समर्थांची या पदांतील सूचना पाहिली म्हणजे एकुणिसाव्या शतकांतील प्रसिद्ध जर्मन संगीतज्ञ वॅग्नेर याच्या अशाच एका सूचनेची आठवण होते. 'काव्यांतील अर्थछटा ताज्या व टवटवीत रहाव्या यासाठींच स्वरालापाची योजना असते याचें गायकांनीं विस्मरण पडूं देऊं नये' असें वॅग्नेरचें म्हणणें असे. अर्थनिष्ठ वा आशयनिष्ठ कलेच्या दृष्टीनें विचार करणाऱ्यांना समर्थांचा हा संगीत विचार महत्वाचा वाटेल आणि आजच्या नाट्यसंगीतावर संगीताचें आक्रमण होत असल्याबद्दल खिन्न झालेल्या विचारवंतांनाहि या विचारांतील ताजेपणा पटेल. समर्थांनीं व्यक्त केलेला हा कलाविचार भक्तिसाधनेच्या दृष्टीनें केलेला

असला तरी तो कलासाधनेलाहि आपलासा वाटावा. किंबहुना या ठिकाणीं समर्थांची भक्तिसाधना ही कलासाधनेच्या हातांत हात घालून चालली आहे असें वाटूं लागतें. आणि मग मनांत विचार येतो कीं कलेचा विचार करतांना आपण कोणत्याहि मार्गानें गेलों तरी शेवटीं कलेच्या मूलतत्वाशींच येऊन पोचतों.

संतसाहित्यांतील नटनाट्याचा विकास पाहता पाहता शेवटच्या टप्प्याशीं आपणाला मिळालेला हा निष्कर्ष कलेच्या साधकांनाहि खचित महत्वाचा वाटेल.

आणि बहुधा ही गोष्ट लक्षांत घेऊनच या प्रेमळ भक्तांनीं आपल्या प्रियोत्तमाला वश करण्यासाठीं ह्या नृत्यगीत वादित्तादि कलांचा–ह्या ' नटनाट्या ' चा साधना म्हणून उपयोग करून घेतलेला दिसतो. बंगालचे प्रसिद्ध भक्त महाप्रभु गौरांग, गुजरातचे नरसी मेहता, राजस्थानची मीरा आणि मथुरेचे सूरदास ह्या साऱ्या भक्तांनीं ह्या निरनिराळ्या कलांच्या साह्यानें आपली भक्तिसाधना पुष्ट केली. भारतवर्षांतील इतर साधुसंतांप्रमाणें महाराष्ट्रांतल्या संतकवींनीहि आपल्या भक्तिसाधनेला नटनाट्याची जोड दिलेली दिसते.

प्राचीन मराठींतील कलात्मक प्रवृत्तीच्या अभ्यासकाला संत कवींचें हें ' नटनाट्य ' बरेच मनोरंजक आणि उद्बोधक वाटेल.

मराठींतील ' नटनाट्या 'चा पहिला उल्लेख मुकुंदराज आणि ज्ञानेश्वर या दोघांच्याहि ग्रंथांत आढळतो. फरक इतकाच कीं मुकुंदराज सगुण भक्तीच्या विवेचनांत तो दृष्टांताच्या स्वरूपांत करतात तर ज्ञानेश्वरांनी तो भक्ताच्या कीर्तनांतील एक अंग या दृष्टीनें केलेला आहे. दुसरी गोष्ट म्हणजे ज्ञानेश्वर ' नटनाट्य ' असा शब्द वापरत नसून 'नटनाच' असा वापरतांना दिसतात. 'नटनाच' याचा अर्थानें 'नटाप्रमाणें नाच' वा ' नटाचा नाच ' असा असूं शकेल किंवा ' नटणें आणि नाचणे ' याहि अर्थाचा संभव आहे परंतु ज्ञानेश्वरांनीं केलेल्या उल्लेखाचें स्वरूप पाहतां पहिलाच अर्थ योग्य वाटतो. मुकुंदराजाप्रमाणें ज्ञानेश्वर ' सोंग ' या अर्थानें त्याचा उपयोग करीत नाहींत. त्यासाठीं त्यांनीं ' बहुरूपी ' हा शब्द वापरलेला आहे. त्यावरून ज्ञानेश्वरांच्या काळांत करमणुकीखातर सोंगें घेतलीं जात असलीं तरी कीर्तनांत ती घेण्याची प्रथा असावी असें निश्चयात्मक रीतीनें सांगतां येत नाहीं. पण देवापुढच्या रंगशिळेवर नाचण्याची प्रथा फार जुनी आहे. तीच प्रथा ज्ञानेश्वरांच्या काळांत कीर्तनपरंपरेंत रूढ होऊं पहात असावी आणि सामुदायिक रीतीनें होणाऱ्या या नटनाचामुळें भगवद्भक्तीच्या कीर्तनाला चांगलाच डौल येत असावा असें ज्ञानेश्वरांच्या या ' नटनाचा ' च्या उल्लेखावरून वाटतें. गीताभाष्याच्या ९ व्या अध्यायांत ' सततं कीर्तयन्तो माम् ' यांतील ' कीर्तयन्तः ' या पदाचें विवरण करतांना ज्ञानेश्वरांनीं या कीर्तनभक्तीचें जें डौलदार वर्णन केलें आहे त्यांतील पहिल्याच ओवींत नटनाचाचा उल्लेख आला असून त्यामुळें श्रोत्यांत आनंदाची कशी वृद्धी होते तें या विवेचनाच्या उपसंहारांत सांगितलेलें आहे. ●●●









अनुक्रमणिका





—दत्ता कदम



**भादव्यांवलं** हिरवेपण अंशीसही डोळ्यांत भरत होतं. तिनसानची सर आली तेवढीच. ओलावा भंवतालीं दबदबलेला होता. धकटू एक झोंप काढून उठला. रोजच्यासारखी बत्ती टेकतांना आयशीनं त्याला भाकर दिली होती आणि आयशीबरोबर चार गोष्टी करतां करतां घशा-खालीं भाकर रेटून घोंगडी पसरली होती. त्यानं काळोखांत डोळे खुपसले. आयशीनं वाकळेवर मुरगुटी मारली होती. आयशीला जाग येईल म्हणून जांभय मारून धकटू उठला. घोंगडी त्यानं अंगाला लपेटून घेतली. गेलडीचा सोट्या घेऊन बाहेर पडतांना दार हलकेंच फलुन घेतलं.

जगांत येउन धकटूला वीस वर्षं झाली होती पण कधीं पायाला पायताण लावलं नव्हतं. त्या बाबतींत आयशीच्या पाणावलेल्या सांगण्याचाहि त्यानं अव्हेर केला होता. आय-शीला म्हणाला होतां, ' अग्ये आये, देवाच्या तरी पायांत पायतान हाय काय ? कुटं बी जावन खायलाबी देव बग.' त्याच्या तळव्यांनी सारे ऋतु पचवले होते. त्याच्या अनवाणी चाल-ण्याचं कातळवाडीला कधीं नवल वाटे, कधीं कौतुक वाटे; पण त्याला त्याचं कांहींच वाटत नंव्हतं. ' त्यांत काय ?' येवढंच त्याचं बोलणं.

धकटू वाड्यापाशीं आला. त्यानं दाराची खिळी काढली. ओळखीच्या आवाजानं गुरांनीं कान टवकारून अंगं ताणलीं. साखरीनं मान वेळावली. पांखऱ्या पिल्या जोडीनं पुढच्या उजव्या खुरक्यांनीं माती खरवडली. म्हातारा समींदर आपलं अंग संभाळून उठला. पाड्यानं उगीच इकडं तिकडं ढुसकलं. फक्त पांचच गुरं वाड्यांत. म्हातारीचा तितकासा नाहीं. पण धकटूचा गुरांच्यात सारा जीव.

धकटू आंत आला. तानपी साखरीच तेवढी उठायची होती. कां ऽऽ ग कां ऽऽ ग बाय करत त्यानं तिच्या अंगावरनं हात फिरविला. तिच्या मानेखालीं खांजवलं. साखरी उठली. धकटूची घालमेल थांबली. त्यानं गुळक्या उडवल्या. गुरं पसाऱ्याला बाहेर पडलीं.

गोवंडांतून आडवणाला आल्याबरोबर गुरांनीं गवतांत तोंडं घातलीं. रानपांखरं झोपीं गेलीं होतीं. कानोसा घेऊन वेडीपिशी टिटिवरी तेवढी आकाशांत गिरकत होती. जागेपणाचा तिला बिचारीला शापच दिलेला आहे देवानं. ' ऱ्यायची मारी टिटिवरीच्या त्या ऽऽऽ मी धकटू म्हायत नाय ?' म्हणत त्यानं कातळीवर कुलें टेकले.

रातची मास त्रास देत नाहीं म्हणून गुरं कशी निवांतपणं चरतात. जांगळपण करूं लागल्यापासनं हा पसारा कधीं धकटूनं चुकवला नव्हता. कोंकणांतली गुरं पावसाळ्यांतल्या चाऱ्यावरतीच अंग धरतात आणि वर्ष काढतात. चरणीचा हा मोसम धकटू कधीं फुकट घालवीत नसे, कधीं चुकारपणा करीत नसे. आयशीनं एकदां सुनावलं, ' पोरा, का व्हयशी सोन्या-सारक्या जिवाची तानडनी करतोयस...येकच्या-येक हायस पोटीं...पायाखालीं घात व्हायाचा' तेव्हां धकटूनं आयशीचे दोन्हीं खांदे धरून

सांगितलं, 'ती सारीं माजीं भावंडं हायत आये. तूं काय चिंता करूं नंको. भावंडांसाटनं काय करतांना कदी वायट व्हतं व्हय?' आणि खरोखरच कातळवाडींत अनेकांच्या पाया-खालीं जिवाणूं लागत होतं पण धकटूच्या वाटेला तें कधीं गेलेलं नव्हतं.

घटका गेली आणि समोरच्या सांवटांतनं सात आठ गुरं आडवणाला आली. गुरांनीं गवतांत तोंड घातलीं. पाटनं होते दोघेजण.

...पाव्हण्यानं करांगळी दाखवली आणि तो तसाच अंधारांत शिरला. पण पाव्हण्याचा एक कान त्या दोघांकडे होता. ते दोघं गुलगुल हंसत होते....आणि मग,—खोताचं नांव घेतांच...पाव्हण्याची शोधाशोध सुरूं झाली. पण पाव्हणा होता कुठं....?

'धकट्या!' एकानं साद घातली.

'काय रं रोम्या. वकतसा आज?' धकटूनं विचारलं. पहिल्या पहिल्यानं पसाऱ्याबद्दल रोम्यानं धकटूची बरीच नालस्ती केली होती पण उन्हाळ्यातहि धकटूची गुरं थोडीं शेवाळलेलीं रहातात हें त्याच्या ध्यानात आल्याबरोबर स्वतःच पसारा सुरूं केला होता. रोम्याबरोबरच्या माणसाकडं धकटूनं उभं आडवं बधितलं.

'ह्ये पावने आलेयत इम्रवलीसनं. तवां वायच वकत जाला.'

'आसं'

'गुलक्या उडवल्या गुरांच्या तवां ह्ये म्हनाले, मी पन येतो. मी नको म्हटलं तरी माजं काय ऐकलानी नाय. सारीं मानसं नको म्हनाली पन ह्येचं म्हननं बारानबारा चव्वीस वरसानीं आलोय मुलकांत तवा जरा जिवाचा मुलूक करूं.'

'लोक म्हनतात जिवाची मुंबय करतात.'

'आरं पन ह्यासनी ह्याच म्येवा.' रोम्याच्या बोलण्यावर पाव्हणा हंसला.

'पटलं हां रोम्या बाकी पावन्यासनी. मुंबयं कशी काय हाय तुमची?' धकटूनं विचारलं.

'मुंबय ऽऽ मुंबयच ती' पाव्हण्यानं मान उडवली.

'अवो मुंबयच. कोन कातलवाडी म्हनतंय. पन मदी काय हाजा लागला व्हता मुंबयला म्हनू इचारलं.

'अवो मुंबयला काय व्हनार हाय? तुमी मुलकांतली मानसं काय तरी ऐकतांव आन बोलतांव. अवो सवशान्यानू, मुंबयसारको अक्क्या दुनयेंत नंगरी नाय. काय? लय झ्येक. डोलं दिपतात जंव जंव बगावी तंव. पैश्याची नंगरी हाय तीऽऽ'

'पाव्हन्यांनू, पैसाबी दादा आनऽऽ मानसंबी दादाच थतं. काय रं रोम्या?'

'लाक बोललास धकट्या. पन पावन्यासनी त्या दादा लोकांची लय भीती वाटते.'

'ती रं कां?'

'आरं लालबाग का बागलाल काय म्हनतात ना थकडं येका दादानं ह्यासनी जलमाची आटव व्हान्यासारकं चोपलान.'

रोम्याच्या सांगण्यानं धकटूला हंसूं आलं. पाव्हन्याला एकदम खड्यांत पडल्यासारखं झालं. धकटूनंच विचारलं, 'व्हय काय वो पावन्यांनू?'

'नाय कशा बावा म्हनायचं? त्येंच्या गिरनीच्या संपात गेलो नाय म्हनुन पिटलान मला. तवापासनं जाम धाक घेतलाय मारामारीचा. भंगास गेली ती मारामार.'

'अवो बापयाचा जलम घेवन दोन हात करायस भितांव? अराराराराऽऽऽ' धकटू म्हणाला.

'चार हात करायस नाय डरलो तं दोन हात करायस? सोडा वार्ता. पन सुकाचा जीव इनास्कारन दुकांत घाला कां? आपन कुनाच्या आल्यात नाय गेल्यांत नाय. आपलं तरासन खातं बेस आन् शिमीटची चाल बेस. जगजग उरापोटावर घेतो कोन?

कांहीं तरी बोलायला रोम्यानं तोंड उघडलं होतं पण समोरच्या जाळीकडं कसला घुसदा पडला म्हणून 'धरय ऽ सूं य ऽऽ हारं हारं' करीत तो काठी आपटीत तिकडं पळाला. एकदम रोम्याला फेपरं कसलं आलं याचा पाव्हण्याला अचंबा वाटला. त्याच्या मनांत जरा चरचरलं. धकटूचा पिल्या जाळ घुसडून पुढं चालला होता. त्याला रोम्यानं मागं फिरवला. संशय फेडायला जळ्ळीवर चारपांच काठ्या ढांगस्या आणि तो परतला. धकटू उठतच होता.

'उटू नको...नको...तुजा पिल्या' रोम्या म्हणाला.

'जालं काय बुसदावला. वकारी आली व्हंय चरायची? ग्येला कुटं?'

'जात व्हता फुडं. परतवला.'

'कालोक लय भयान हाय नाय?' पाव्हण्यानं विचारलं. त्याच्या मनांत काळोखाचं रामायण सुरूं झालं होतं.

'तं काय शिनग्याचं चांनं पडंल? बुनरपी पावस पडं पावत गुराढोरानीं तकवा धरायस हवा म्हनुन व्हयसाच पसारा काडावा लागतो. मं कालेक काय आन जीव जिवानूं काय! त्येसनी भिवन चाललंय? पण धकटूच्या शब्दापेक्षां गवतातल्या सळसळींतच पाव्हण्याचे कान उभारले. बारा नि बारा चोवीस वर्षे इम्रवली न बघितल्यानं पाव्हना पार मुंबयकर बनला होता. रोम्याची गाभणी गाय बिथरली आणि फुरफुरली. 'रोम्या रोम्या...पायाखालचा' म्हणत धकटूनं कातळावरून तिकडं धांव घेतली. प्रसंगाची उमज पडतांच पाव्हण्याला घाम फुटला. घोंगडीच्या उबेमुळें तर अधिकच भिजला. छत्री न घेतां पाव्हण्यानं रोम्याजवळनं घोंगडीच घेतली होती. सारी गुरं पण बिथरल्यासारखी झाली. रोम्या धावला. मग पाव्हना एकटा राहून काय करतो? तोहि कसाबसा धांवला. पाव्हण्याला तिथंच बसायला सांगायचं कुणालाच भान राहिलं नाहीं. धकटूनं गायची शिंगोटी धरली. रोम्यानं कोंबरीच्या खिशातून चिलमीसाठीं बाळगलेली कांडीपेटी काढली आणि कांडी ओढली. डोळ्याच्या डोळ्यानीं पाहिलं पण गाईच्या जिभेला कुठं रक्ताचा उमडा आढळला नाहीं.

'काय नाय काय नाय...पांडर हाय पाटीशी' गायची शिंगोटी सोडून धकटू म्हणाला. गाय धापावत जरा उभी राहिला. मग तिनं पुढचा पाय चाटला. गवताचा चावा मारला तसा धाकटू म्हणाला, 'आरं काय फुकटची मेहनत करताव हाय काय? तो लय असंल आयत्या बिलावर नागोबा पन आमी ताट हाव हितं.'

रोम्यालाहि हायसं वाटलं. बऱ्याच वर्षांनीं त्याची गाय गाभण राहिली होती.

'नाय ना काय?' पाव्हण्यान विचारलं.

'नाय नाय. पन ह्या पायाखालचा कदी








छोराच्या जिबेला ढोस घेथल त्याचा नेम नाय. लय अवक्करमाशी जात ' धकटू म्हणाला.

' तुमच्या पायांत बी नाय ' पाव्हणा काळ-जीनं बोलला.

' त्याची नको चिंता पाव्हन्यांनू. माज्या वाटंस नाय कोन जायाचं. अवो ह्ये तलवे येवडे फरंशी परमान जाल्यत का चावनाराचं दांतच नाय पडले तं नांवाचा धकटू नाय मी.' हंसत धकटूनं सांगितलं.

' हाय बाकी हाय. आमचं काय चपली-शिवाय नाय जमायचं. ' पाव्हणा म्हणाला.

गुरं चरूं लागली तसे तिघे पुन्हां कातळी-वर आले. रोम्यानं चिलमी भरली. धकटूनं कांडी लावली. नाकातोंडांतून धूर निघाला. पण पाव्हण्याचं चित्त थाऱ्यावर राहिलं नाहीं. कसली गंमत करायची कर्माची ! झक मारली आपण यांच्यासंगं पसाऱ्याला आलो असं झालं त्याला. नायगांवला असलेली त्याची बायको त्याला आठवली, स्वतःची पांच पोरं आठवली. गिरणींतला धोटा आठवला, लालबागचा बाजार आठवला...आणि...आणि आपल्याला जिवाणूनं डंख केलाय...आपल्याला तिरडीवर घातलंय...आपली बायको-पोरं रडतायत...एक ना दोन...मनच्या मनांत पाव्हण्यानं स्वतःच्या थोत्राडींत मारून घेतली. आणि नंतर मात्र बिकट गत आली. काय देवाची करणी. त्याच-वेळीं पाव्हण्याला लघवीला झाली. पण आजू-बाजूला त्याचं पाऊल सरकलं नाहीं. तेव्हां लघवी थोपवतां थोपवतांहि मुंबयच्या मुत्रींतल्या रांगेचं सुख त्याला आठवलं...किंजळी आयनांतुन वारा सळसळतांना त्याच्या मनांत ती मघांची गवतांतली सळसळ टोंचत होती. पाव्हण्याचा चेहरा वेदनांनीं भरला. धकटूनं पाव्हण्याकडं बघितलं तेव्हां त्याला पाव्हण्याला विचारावसंच वाटलं आणि तसं त्यानं विचारलं पण, ' पाव-ण्यांनू येवढं कसलं वो दुक व्हतंय तुमाला ! '

' काय सांगायचं ! सारी अन्नूची धिंड.' पाव्हण्यानंहि संधी घेतली.

' बोला तरी ' रोम्या म्हणाला.

' अवो धायच...' आणि पाव्हण्यानं दोघांना किरंगळी दाखवली. दोघांनाहि हंसू लोटलं. धकटू म्हणाला; ' हत्तिच्या, ही काय मुंबय हाय व्हय येवढी पंच्यात पडायस ! अवो मनासं वाटंल थितं बसा हितं; बसा. आमी पाट फिरवताव, बसा. '

आणि धकटूनं पाठ फिरवली. रोम्यानंहि. पाव्हणा खटावला. पण बरी सोय झालीसं वाटलं त्याला. पाव्हणेपणानं तो दोन पावलं पुढं सरकला. रुजीव धोंड पाव्हण्यानं पसंत केली. बसला.

कवाळट्यांतलं वारं धकटूच्या टाळक्यांत भिरभिरलं. रोम्याच्या कानाला तोंड लावून तो म्हणाला, ' पसाऱ्याला आलंय ह्यं मुंबयचं पेपदं. वांयच भंबेरी उडवतो ह्येची. '

' नको नको बावा...फाटकन परान ग्येला पावन्याचा तं उंद्या बेड्या ठोकील आपल्यास देवरुकचा कोतवाल. चुलतीच्या भावंजयचा मामेभाव हाय तो. मला कोन जितं नाय ठेवायचं घरांत. पाया पडतो पन धकट्या भलतीच मस्क...' पण तेवढ्यांत पाव्हणा लटपटत आल्यामुळं रोम्याचं बोलणं घशांतच राहिलं. धकटूला जरा चेव चढला.

' काय वो भलतंच ! ' पाव्हण्यानं विचारलं.

' नाय बा काय. हेरीच. ' रोम्यानं खुलासा केला.

' जल्ला गारटा काय मारतो ' पाव्हणा पुटपुटला. पहिल्या बोलण्याकडं त्यानं फारसं लक्ष दिलं नाहीं.

' अवो मुंबयची इज हाय इकडं. थोडीच ! गावंड्या गावाचं काय ! लय जालं तं पिरसा मातर मुंबयस न्हायलेव पन सारं मुलकांतलं इसारलेव. '

' काय फायदा हाय ध्येनांत ठेवन ? अवो जितं मानसाचं प्वाट भरतंय तोच त्याचा मुलुक. येकदां का नाकांतली हवा गेली का कायपन माजं माजं केलेलं पाटनं येत नाय.'

' तं पन खोटं नाय.' धकटू म्हणाला.

थोडा वेळ कुणीच कांहीं बोललं नाहीं. जो-तो आपापल्याच विचारांत गुंगला होता. गवतांतून वर तोंड काढायला गुरं तयार नव्हती.

आणि मग गडबडीनं कातळावर सोटां आपटीत धकटू रोम्याला म्हणाला; ' रोम्या रोम्या ऐकलंस काय ?'

' आँ ? रोम्यानं विचारलं.

' बाबू खोताला कुनीतरी चुगली केलान हाय.'

'कसली रं ?' रोम्याचा आवाज गंभीर झाला.

' काऽऽऽ मी आन् तूं त्याच्या कुरनांत गुरं पसाऱ्याला घालतो म्हनून.' धकटूहि गंभीरपणं म्हणाला.

' कोन रं कारटा चुगली करनार ?' रोम्यानं चिडून विचारलं. त्याला मुळींच सहन झालं नाहीं.

' हाय येक मसना मांडवकर. पन मला कुनकुन लागलेयऽऽऽ'

' कुनकुन ?'

' हाऽऽ गड्यासनी घेवन खोता बाबू खोत पालतीवर न्हानार हाय.'

' त्याचा वर पोचलेला म्हातारा बाबाय हवा पालतीवर न्हायास.'

' आरं पन चुकुन जरी येकादं ढोर तिकडं ग्येलं तं हानामारी व्हनार आज रातची...'

धकटूच्या सांगण्यानं पाव्हण्याच्या धिटा-इला ताप भरला. कावला स्वतःवर तो... गुरं पोटं भरून चौखुर लागतील...हे दोघे एक घेतील दोन देतील...आपलं मात्र ह्या पसाऱ्यांत झुणक्याचं पीठ होईल... माझ्या पांढराय ग तुला गिरणीचा येक बुरणुस देयन पण अशी वेळ आणूं नको... पाव्हण्याचं रक्त उलटं वाहूं लागलं. गार गार वारा घोंगडीतूनहि पाव्हण्याच्या अंगाला चावूं लागला...त्याला ट्रामसधला वारा आठवूं लागला... आज आपल्याला कातळवाडीलाच यायची अवदसा कां सुचली याचा त्याला विचार पडला...अपितार अपितार...

धकटू स्वतःशीच हंसला आणि भर दुपारच्या सहजपणानं गुरं परतावयाला काळोखांत घुसला. आणि रोम्याच्या डोक्यांत बाबू खोत कुठंसा लपून राहिल याचाच अंदाज ठांसुन भरत चालला होता. पाव्हण्याच्या चेहऱ्यावर मात्र कसलं तरी निश्चयाचं बळ अवतरलं.

डोकं खाजवलं आणि पाव्हण्यानं रोम्याला हाताची किरंगळी दाखवली.

---

**महत्त्वाची सूचना—**

ज्यांची वर्गणी या अंकानें संपते त्यांनीं कृपा करून येत्या १० तारखेच्या आंत आपली पुढील वर्षाची वर्गणी पाठवून द्यावी. व्ही. पी. पद्धत नाहीं.

—व्यवस्थापक

अनुक्रमणिका






'मगाशीच बसलेव ना ?' एकदम जाग आल्यागत रोम्यानं विचारलं.

'पावसाच्या दिवसांत व्हते मानसाला लय' पाव्हण्यानं वेळ निभावली.

'जतनं जावा. आन ऐका. मगासारकं खालीं बसूं नका. ह्या पावसाच्या दिसांत भादूर असतात. भलतीच येळ यायाची.' रोम्यानं खाजगी सल्ला दिला पाव्हण्याला.

पाव्हण्यानं मान हलवली आणि जीव मुठींत धरून काळोखांत घुसला. पाव्हण्याच्या पायांत मुंबयचं नाजुक चप्पल होतं. लिबलिबीत. कातळीवर कांहीं थरेना. रोम्या बाबू खोताच्या विचारांत गुंगला होता. आलेली वाट पाव्हण्याला पुसटशी आठवत होती. त्यानं कसाबसा गोवंड गांठला. पांढरीचा धांवा चालवला. रामनामाचा पिट्टया पाडला. पाव्हण्याला तो रोम्याच्या घराचा गोवंड वाटत होता. घर दिसल्याबरोबर आसरा बघून त्याला हायसं वाटलं...निभावलों वाटलं...मरूं दे तो पसारा ...ह्यापक्षीं गिरणींची रातपाळी बरी...ओटीवर घोंगडींत पाव्हण्यानं गुपचुप मुरगुटी मारली.

'पावन्ये रं कुटं हायत रोम्या.' धकटू आला होता.

'पावन्ये व्हय ? किरांगली दाकवून हिकडं ग्येले, पन अजून काय पत्त्या नाय. मी आपला बाबू खोताच्या इचारांत हाय. कुटल्या काटर्यानं त्याला सांगितलानं...' रोम्या म्हणाला.

तें सारं ऐकून धकटू केवढ्यानं तरी हंसायला लागला.

'अँ ? धकट्या ? वो धकट्या...काय हसाया याड लागलं कां काय ? अँ ?' रोम्या अधिकच प्रश्नात गुंतला.

'आरं रोम्या, तुज्या पावन्यान धाक घेतला हानामारीचा. मी थट्टेन बोलली.'

'थटा ? खरं ? आयच्यान धकट्या ?'

'आयच्यान सारी थटा.'

'म्येलास. तुझ्यावर पडलं कातेरु.'

'का रं ?'

'आरं पन पावना कुटाय ? माज्या नांवाला आतां सारा बटा.'

'पन मी सांगितलं तं तुला का गंमत करतांर हाय म्हनूंन.'

'मलं पन संशेंव नींयें आला. मी त्यां बाबू खोताच्याच इचारांत हाय.'

'तरी ब्येस गिऱ्याजकनीच्या मालका नाव काडस्या.'

'पन धकट्या याद केलस. माजी चुलती मला हिरवी खायल. ज्याच्या त्याच्या मुलकांत जो तो बापया. ह्यां पावना हिथं कसला बाप्पा ?

पेपदं तं. पन कुटं दडलाय का पलालाय ? याड क्येलंस धकट्या...ह्यं इकतचं दुकनं...'

रोम्या मणक्या मणक्यांत चरकला. धकटूलाहि थोडं भय वाटलं; पण त्याची गात्रं गळल्यासारखीं झाली नाहींत. पावन्यानूं वो पावन्यानूं करून त्यानं चार पांच सादा घातल्या. पण कुठनं ओ आली नाहीं. रोम्यानं कपाळावर हात मारून घेतला.

'धकट्या, मस्करी जाली आन फासांत मान गेली.'

'काय तरी बोलूं नको रोम्या. जीव घालवासय पन धाडस लागतं. तेवडं नाय पावन्याजवळ.

पावना जिताच हाय पन कुटंतरी मुरलेला हाय.

'मी लावतो तलास. तूं धड चित्तानं गुरं बघ.' धकटूनं रोम्याला सांगितलं आणि धकटू सुद्धां काळाखांत घुसला.

धकटूनं मनाशीं कयास केला. काळोखाचा रापा घेत तो रोम्याच्या घरीं आला. कोण चिटपांखरूं जागं नव्हतं. ओटीपडवीचा कोन कोपरा त्यानं पाहिला पण पाव्हणा सांपडला नाहीं. रोम्याची सणक त्यालाहि झोंबली.

पण धकटूनं थोडं डोकं ताणलं. त्याचा आणि रोम्याचा गोवंड जिथं मिळतो तिथें त्याचं मन गेल्याबरोबर त्यानं स्वतःच्या घराकडं पाय वळवले.

त्याच्या घराच्या ओटीवर टिकटिकेली बत्ती त्याला लावणीच्या बांधावरनं दिसली. तो अंगणात आला. त्याची म्हातारी लेकाला उठवीत होती, 'धकटू रं, बावा ऊट, अर्दी रात सोपली, पसाऱ्यास गुरं सोडतोयस ना ? काय रं...'

आयशीचं बोलणं ऐकून धकटूला हंसूं आवरलं नाहीं. पडवीला येतां येतां धकटू म्हणाला, 'अग्ये आये, रोम्याचे पावन्ये हायत त्ये.'

पण प्रसंग भलताच झाला. म्हातारीला काय माहीत ! ती धकटूच झोपलायसं समजत होती. धकटूला बाहेरून येताना बघून म्हातारी भू भू भूत करून बोंबटली. धकटूनं आयशीला सावरलं. थाडकन घोंगडी दूर सारून पाव्हना उठला. बिचाऱ्याच्या तोंडून शब्द आला नाहीं. आयशीला सावध करून धकटूनं सारा प्रकार तिला सांगितला आणि रोम्याची धडधड थांबवायला गोवंड धरला.

■■■

## तीन वात्रटिका



एक होती वहाण
ती चुकून देवघरांत गेली.
तिथली सहाण
चंदनाला काय म्हणाली.
"विंचू पिंडीवरला
अजून नाही मारला"

★★★

एका हापीसांत
एक होती खुर्ची
तिला मिळाली
जागा वरची.
साहेब झाली
–पेणसलींत निघाली.

★★★

एक होती काळी कुळकुळीत छत्री
तिच्याशीं करेना कुणी मैत्री
तिकडून वळवाचा पाऊस आला.
'हळुच उघड-!' छत्रीला म्हणाला.
छत्री उघडली,
मैत्री बिघडली.

★★★

—जयवंत गुजर

*श्री जॉर्ज मोलनार हे ऑस्ट्रेलियाचे ख्यातनाम व्यंगचित्रकार आहेत. ते जग पाहून आले, देशांदेशांतून प्रवास केला. प्रवासांत त्यांनीं कधींही कोणाला माहिती विचारण्याची जिज्ञासा दाखविली नाहीं कीं कधीं तपशिलांत शिरले नाहींत. जें पाहिलं तेंही उफराट्या नजरेनं पाहिलं. ' आपण जिवंत आहोंत म्हणून पगार तक्त्यावरील आपलं नांव राहूं द्यावं ' ह्या शुद्ध हेतूनेंच तो दर आठवड्याला ' सिडने मॉर्निंग हेराल्ड ' ला एक पत्र पाठवी. तीं वरवर उथळ, स्वप्नरंजीत कल्पनांनीं सजविलेलीं आणि दिशाभूल करणारीं वाटतात. जीवन सुद्धा असंच असतं. मोलनार यांनीं काढलेल्या प्रत्येक रेषेंत विनोद ओथंबलेला असतो. जीवनांतील उपरोधिकपणा त्यांत पूर्णपणें नटलेला असतो. त्यांच्या पत्रांतहीं नेमके हेच गुण विखुरले आहेत. अशीं......*

हीच तीं व्यंग चित्रात्मक पत्रें

# चित्र * पत्रें *



## हें विमान फिरतें अधांतरी

स. न. वि. वि.

पहिल्या वर्गाचे प्रवासी ऐसपैस बसले आहेत. तसें सगळेंच प्रवासी आरामांत बसलेंत. आम्हीं उड्डाण करीत आहोंत.

जो तो स्वस्थ बसलाय. कांहींही करीत नाहीं. मीही स्वस्थ बसलोय. कांहींहीं करीत नाहीं.

खुंटी पिरगळा. कळ दाबा. जें पाहिजे तें मिळेल. आधुनिकतेचं वारं प्यालेल्या माणसाला सुख मिळावं म्हणून इथें वाटेल तशी धडपड केली जातें. त्याच्या सुरक्षिततेची इंचे इंच काळजी घेतली जाते. मी खुंटीही पिरगळतो, मी कळही दाबतो. मी सुखांत आहे, मी सुरक्षित आहे.

हवाई-सुंदरी पऱ्यांसारखा संचार करीत आहेत. नेहमी ताजं वाटावं असं गुलाबी हास्य त्यांच्या ओठावर झुलत असतं. चिंचोळ्या दालनांतून त्या तुरुतुरु वावरत असतात, शरीराला किंचित हेलकावे देत. प्रवाशांना घसटून जातांना त्या त्यांच्यावर हास्य ' उधळतात '— मोहक, दिलखुलास, थोडं फार मादक, आणि तरीही साचेबंद असं हास्य— प्रवासी ते आपल्या कोटावर फुलाप्रमाणें खोचतो !

हवाई-सुंदरी तुमच्यासाठीं मासिकं आणतात. सिगारेट, खाद्य-पदार्थ, पेय, वाटेल ते. ( पण भलतंच नाहीं ) तुम्हांला एकटं एकटं वाटूं नये म्हणून ही धडपड. हा एक गोड पहारा असतो व घरींदारीं असतोच. शिवाय इथेंही. प्रवासी हतबल होतो. तुम्हीं कैदी असता. कांहीं तरी करा, कांहीं तरी वाचा, कांहीं तरी लिहा, कांहीं तरी बोला. कांहींहीं न करतां बसलेलें आढळलांत कीं सुंदरीनें तिच्या ताब्यांत तुम्हांला घेतलेंच म्हणून समजा. तिच्या हास्यांत तुम्हीं गुरफटता... गुदमरता.

प्रियेच्या आतुरतेनें रात्र दिवसाकडे लगबगीनें निघाली आहे. निम्म्याहून अधिक प्रवास तिचा संपलेला आहे. थोड्या वेळानें पहाट फुटेल. आम्हीं आतां ३५,००० फुटांवर आहोंत. विमानाबाहेर अंधार आहे, विमानांत ' हास्य ' आहे.

मी झोपण्याचा खूप प्रयत्न करतोय. पण भेसूर स्वप्नें मेंदूला मधून-मधून धार लावून जाताहेत ! विमानांत झोपायला पलंग नाहींत म्हणून मी उगाच शिव्या देतोय. ह्या अशा अवस्थेंतही मी अर्धवट डोळे

मिटून पडून आहे. तसं मला पडलंच पाहिजे, (नाहींतर ती 'बया' त्रास देईल ना !)

### होनोलुलु

स. न. वि. वि.

इथला बाजारहाट दृष्ट लागण्या इतका श्रीमंती आहे. रस्त्याच्या दुतर्फा उंच कांचेची भिंत आहे.

ह्यामुळें ह्या रस्त्यावरून जातांना आजुबाजूची शोभा दिसत नाहीं. लाटांशीं खेळण्यांत मशगुल झालेला समुद्र दिसत नाहीं, कीं दुसऱ्या बाजूला असलेल्या टेकड्या-ज्यांनीं डोक्यांत ढगांची वेणी माळली आहे-दृष्टीस पडत नाहींत. प्रवाशाला मात्र ह्या रस्त्यावर असलं कीं वाटतं, 'आपण सुखरूप आहोंत-दोन्ही बाजूंनीं तटबंदी आहे म्हणून.'

इथें येणारे बहुतेक प्रवासी वयस्क असतात. समुद्र-किनारीं हवा खात बसलेले असतात. कोणी चटईवर पहुडतात. कोणी वाळूवर. कोणी डोक्यावर छत्री घेऊन. ह्या छत्र्या धरण्यासाठीं लहान लहान स्थानिक पोरं हमाली करतात. प्रवासी मजेत असतात.




इथलें रहिवासी काळेकुट्ट पण रेखीव आहेत. अमेरिकनांकडून ह्यांची पिळवणूक होत असते. पण ते दुसऱ्या मार्गानें अमेरिकनांचीं पिळवणूक करतात. जो तो सुखी आहे.

इथला प्रमुख व्यवसाय म्हणजे पाहुण्यांबरोबर (अर्थात प्रवासी) फोटोसाठीं उभें रहाणें. फुलांच्या माळा विकणें, नाच, गाणीं व बजावणं. ह्यामुळें ह्या रहिवाशांना खूप पैसा मिळतो. इतका पैसा कीं त्या जोरावर तें हें बेट सहज विकत घेऊं शकतील !

### सॅन्फ्रान्सिसको

स. न. वि. वि.

सकाळींच सॅन्फ्रान्सिकोला आलो. रोम सोनेरी आहे. पॅरिसचा रंग करडा आहे. सॅन्फ्रान्सिको शुभ्र आहे. आकाश शुभ्र. रस्ते शुभ्र, बंदर शुभ्र. प्रत्येक रस्ता टेकडीवरून खालीं उतरलेला दिसतो.

• हें तितकं बरोबर नाहीं. हें मलाही कळतंय. ह्यामुळें टेकडीवर चढण्यासही प्रत्येकानें शिकलंच पाहिजे. पण मला असं सांगण्यांत आलं कीं अस्सल सॅन्फ्रान्सिसको माणसाला ह्या परिस्थितीला कधींच तोंड द्यावं लागत नाहीं. गुरुत्वाचा नियम त्याच्यासाठीं सैल होतो व तो जातो तिथें त्याला उतरण लाभते.

इथें मला पहिल्यांदाच असे अमेरिकन भेटले कीं जे इथें 'टूरिस्ट' म्हणून आलेले नसून इथले रहिवासी म्हणून ते इथें राहतात.

अमेरिकन इथले रहिवासी आहेत हें खरं असावं कारण इथलें हवापाणी त्यांना मानवणारें आहे.

इकडे वयस्क बायकांचं प्रमाण जास्त. पुरुष थोडे आणि ते क्लबांतून वास्तव्य करून असतात. एकलकोंडेपणानें. पण वस्त्रोंप्रावरणें वगैरे करतात व सामान्य माणसाप्रमाणेंच बोलतात व वागतात.

तो प्रसिद्ध 'गोल्डन गेट ब्रिज' म्हणजे शुद्ध लबाडी आहे. अगदींच लहान आहे तो. म्हणजे काय कीं एखादी भली मोठी बोट त्यांतून सहज जाऊं शकते. आणि ती जाऊं लागली कीं तो पूल अगदींच लहान आहे असं म्हणायला जिवावर येतं. पण त्याची भव्यता पटत नाहीं हें खरं.

कुटुंबामागें एक मोटार ५० टक्के रहिवाशांकडे आहे. पावणेचार टक्के रहिवाशी प्रत्येकीं दोन मोटारी बाळगूं शकतात. १५ टक्के तीन किंवा त्याहून जास्त. फक्त जे अति श्रीमंत आहेत ते मात्र एकही मोटार ठेवूं शकत नाहींत.

इथें चहा कोणालाच माहिती नाहीं. माहिती आहे ती दारू. कांहीं दिवसांनीं आंघोळीसाठींही दारू वापरण्यांत येणार आहे असं ऐकलं.

### मेक्सिको:

स. न. वि. वि.

शहरांतील जुन्या इमारती ओतीव आहेत. पुष्कळशा लाव्हा रसाच्या आहेत म्हणूनच आजूनही त्या उबदार वाटतात.

जुन्या इमारतींकडे दृष्टीक्षेप टाकला कीं वाटतं ओळंब्याच्या साह्यानें ह्या तयार केल्या गेल्या असाव्यात. पण तशा त्या नसाव्यात असं राहून राहून वाटतं.

इथल्या रहिवाशांचा व्यवसाय म्हणजे एकमेकाला लॉट्रीचीं तिकिटं विकणं हा. रहिवाशी वागतात रुबाबांत, चालतात विनयानें, अधोमुख नयनांनीं-विशेषतः पुरुष.एखादा पुरुष जास्तीत जास्त आपले डोळे वर करणार म्हणजे स्त्रियांचीं वक्षःस्थळें न्याहाळण्यासाठीं. बस. पुन्हां नजर खालीं. हा लॅटीन देश आहे.

इथें येणारे सगळे प्रवासी अमेरिकन असतात पण ते इथल्या रहिवाशांसारखा पोषाख करतात परंतु इथलें रहिवाशी प्रवाशांसारखा पोषाख करतात म्हणून फसगत होत नाहीं. अमेरिकन चटकन ओळखतां येतो.

माझ्या बोटाचा इथें ठसा घेण्यांत आला. कशासाठीं ? हें मलाही माहिती नाहीं. कदाचित् माझ्या पासपोर्टशीं वा हंगेरियन प्रश्नाच्या पार्श्वभूमीसाठीं किंवा मनुष्य स्वभावाचें सखोल ज्ञान प्राप्त करून घेण्यासाठीं त्याचा उपयोग करावयाचा आहे कीं काय हें एका परमेश्वराला ठावूक.

मेक्सिकोमध्यें अमाप उत्साह आढळतो. प्रत्येकाला इथें भविष्याची काळजी आहे. त्यांनीं वास्तुशास्त्रामध्यें केलेली प्रगति सांगितली तर इतरांना ती थाप वाटेल. म्हणूनच सांगत नाहीं.

**आपल्या इथल्या खंवट आयकर अधिकाऱ्यांसाठीं-मेक्सिकोमध्यें इन्कमटॅक्स नाहीं.**

• अनुवादक-दि. श्री. कराडकर

*'....आतां तर एवढाच प्रवास केला. नुकता आरंभ झालेला. धक्के हे बसणारच. म्हणून कां पाषाण बनून स्तब्ध राहायचें ! बघ तरी....बघ ना....*

*श्री केशव मेश्राम यांची एक मुक्त भावकथा—*





**आज** आकाश अबोल आहे. झाडांचीं पानें डोळे मिटून निवांत पेंगताहेत. पावसाच्या आरंभीच्या जोषामुळें निर्माण झालेल्या जलाशयावर, हलक्या-फुलक्या लहरी उग्यामुग्यानें वाहत आहेत. दूरवर कुठेंतरी चालू असलेला किलबिलाट अबोल वाऱ्याच्या वासानें हलुहलु झिंगतो आहे. ढगांच्या देहावरून झिरपून उडूं पाहणारी कोंवळी किरणें अवघडून गेलीं आहेत. मुकाटपणें हें सरळें पाहून मीहि चोंदून गेलों आहे...तूं कांहीं बोलतच नाहींस; म्हणून तर सगळें अवघडल्यासारखें झालें. इच्छा असून आभाळाला बोलवत नाहीं. निदान त्या नाजूक किरणांच्या कवळ्या दहीओठांचें हलकेसें चुंबन घेण्यासाठीं तरी बोल. कांहींतरी... मलाच कळेलसें...

...नाहीं आठवत तुला ? मी घाईघाईंत बांधलेला रानफुलांचा तो गजरा. सगळ्यांच्या नकळत अलगदपणें तूं पाणवठ्यावर आली होतीस. झिऱ्यावरून कळशी भरून संथ पावलांनीं तूं परतत होतीस. तेव्हां मी तुला अडवलें होतें...एक गम्मतः फक्त तुलाच सांगायची म्हणून कान मागण्यासाठीं मी हटून बसलो होतो. लटक्या नाईलाजानें कळशी खालीं ठेवून तूं जवळ सरकली होतीस. मी मावळतीकडे पहायला तुला सांगितलं. तूं फसलीस अन् गरकन वळलीस. तेव्हां मीच बनवलेला तो ओबडधोबड, '...तूंच म्हणाली होतीस,' ...गजरा अखेर मी बांधलाच. दंगामस्तींत तुझे व्यवस्थित बांधलेले केस विखरलें होते कांहींशा रागानेंच तूं विथरलीस पण तुलाच पुन्हा अडावें लागलें होतें. तुझ्या पायाच्या धक्क्यानें बाजूला ठेवलेली ती खट्याळ कळशी घरंगळत जी गेली ती सरळ झिऱ्याच्या तळाशीं. आतां ? ' दे ना रे काढून तेवढी ! '

...तशी कळशी बाकी समजूतदारच...मी खाली झुकलो, श्वास कोंडून दोन मिनिटें पाण्यांतच विसावलो होतो. चांगलीच फसलीस. '...केवढी घाबरले होते रे मी !' ...निथळत्या अंगानें मी परतलो होतो. तूंहि चालत होतीस...तरंगल्यासारखी...' अवघी अकरा वर्षांची तर होतीस...पण तरी आपण...झाडांच्या कांहीं पानांची कुजबुज चालू झाली आहे. ती सगळीं पानें बोलणार आहेत... खिदळणार आहेत...

...गांठी एवढ्या पक्क्या बांधल्या त्याला मी तरी काय करणार होतो. सगळेजण मिष्किल डोळे घेऊन टपलेलेंच होते...बाकी उखाणा छान घेतला होतास हं !...काय बरं...

...तुझ्या हातांची मेंदी आणि पायांच्या कडा मढवणारा तो लालबुंद अळता कधी बरं निघाला ? किती लवकर आपण समरस झालों होतों. मला नकळत तूं तयार केलेला तो लोकरीचा स्वेटर... खरं म्हणजे मला कोणत्याच ऋतूची पर्वा वाटत नाहीं. तुला तर माहितच आहे. पावसांतून भिजतांना माझ्या अंगावर गोडवा फुलतो. चटचटत्या उन्हांतून मी संथपणें चालत येतो. हो अगदीं तस्सा...त्या सतपदीसारखा. हिवाळ्यांत...पण तूं जवळ असतांना थंडी वाजल्याचें मला तरी आठवत नाहीं चेष्टा नाहीं. तुझ्या बोटांत एकदां बोटं गुंफली कीं एकदम बरं वाटतं. तसेच तुझे ते बोलके डोळे; त्यावर ओठ टेकवतांना अतीव समाधान लाभतें. पण तो स्वेटर मला इतका छान बसला होता कीं, त्यावरील कुसर पाहून...' तो ' काय म्हणत होता...नाहीं-तरी कॉलेजातले लोकच खट्याळ...जसें कांहीं यांनीं बायकोनें केलेलें कधीं...पाण्यावरील खळबळ वाढतें आहे.

अबोल आभाळ, गुरफटलेलीं उन्हें आणि अडलेलीं मनें सुटी सुटी करीत ती पिवळ्याकंची देहाचा दुपार पसरत जाते. काळ्याशार डांबरी रस्त्यावर एकाददुसरी नवथर लहर उतरते आणि मग तेवढाच काळ सगळें आभाळ शहारते. गंधर्वांच्या पाउलठशासारखा एकादा टपोर थेंब येतो. झाडांच्या चिडिच्चिप पानांना हुसकून लावतो व थरारत्या बुंध्यावरून घरंगळत ऐटीत उतरतो. खारीची सांवली दचकते. माडच मग आपलें अंग चोळून घेतो. तरी किरणें पसरणारच. कोऱ्या दुधावरील अस्तरासारखी हवा शहाऱ्यानें गुदगुल्या करीत आहे. खूप काळ थबकल्यामुळें पायाला मुंग्या आल्यासारखी मनेच उसळते आहे. हलुहलुं सगळें विरजत आहे. आभाळ ओठांतून हसत आहे.

...पावसाची झिरझिर उतरण आज अधिक चांगली वाटते.









**ऑगस्टच्या अंकाचें--**

**हें एक आकर्षण—!**

बऱ्याच दिवसानंतर पुन्हां एकदा—
**श्री. अरविंद गोखले** यांची
खुमासदार व हृदयंगम कथा

## ' एक एकटी '

नेहमीच स्वच्छ राहणारी परीटघडींची पांढरपेशी सडक शृंगारून भटकत आहे· तिच्या मोकळेपणालाहि मागे टाकीत माझ्या स्वभावाचा कोणी तो झिमझिम अंगावर घेत शांतचित्त चालत आहे. ही झिमझिरपण तुलाहा आवडते ना ?...निथळणाऱ्या पानांची तृप्ती तुझ्या चेहऱ्यावरून उतूं जात आहे...नाहींतर आपण संसार चांगलाच केला...केवळ माझी आवड म्हणून तूं गंधापेक्षां कुंकूच लावतेस ना !...धुम्या आभाळालासुद्धां अशीच गुलाबी जरकिनार असते...अशावेळीं तूं कित्ती समंजस होतेस; पांखरांच्या किलबिलीनेंहि नागवेल दचकावी तशी...ऐकूं देत गं लोक ऐकतात तर...ह्या समजुतदारपणानें मी प्रथम अस्वस्थ होतो' आणि मग बहरतोसुद्धां. पहिल्या पावसाचें पाणी गढूळ असतें पण नंतर निवळत फेसाळत राहतें.. किती वेळ चुरडायची ग मातीला अंगठ्याखालीं. बुजऱ्या डोळ्यांनीं चोरून चद्रस्निग्ध चेहरा पहायचा. कुणी बोललेंच नाहीं तर पाऊसच बोलूं लागतो. त्यांत भिजायची मला सुरसुरी येते. आकाशाची कोरडी पाठ तुझ्या बोटांनीं तरी कुरवाळ...खारींच्या शेपटीसारखी ! स्पर्शानेंच बोल ना ? येऊं कां ?...एकदाच...

...अरे हो, तूं सुगरण आहेस खरी...कसा किरकोळ होतो मी लग्नाआधीं. पण रोजचा दुधीहलवा नि भरीस चिवडा. बाकी एकदम अंडीच कप चहाची संवय सुटली नाहींच अखेर. तरी सासूबाई म्हणाल्याच होत्या...तुझी आई असं मुद्दाम म्हटलं नाहीं बरं कां ?...पण एकदां काय फसगत केली होती. काल्यांची भाजीहि गोड करणारे तुझे हात...कायसेंसें आणायला तूं लगबगीनें बाहेर गेली होतीस...फक्त त्याच दिवशीं बरं...चांगले बचकभर मीठ आणि मिरपूड मी कुकरवर ठवलेल्या काल्यांच्या भाजींत बेमालूम मिसळली होती. माझा पूर्वग्रहच वाईट होता त्या भाजीबद्दल. तुला भारी वाईट वाटलें होतें. मी मात्र खूष होतो...चुकतात गं केव्हां केव्हां निःष्णांत ज्योतिष्यांचे आडाखे...आणखीच मळभ दाटतें आहे...एरव्हीं चांगले वागणारे केस कपाळावर येऊन झिम्मा खेळताहेत. माझे शब्दच पुरेसे गरम नाहींत कां ग ? असें कधींच होत नसे. मी बोलूं लागलों कीं, अखेर तूंच तुझे सगळे केस माझ्या खांद्यावर पसरायचीस. मुक्तमोकळ्या रेशमाखालीं मी झांकून जायचा. स्पर्शाच्या लोकरीनें नुसते शब्दच नव्हे तर सर्वांग बहरूं लागायचें. तरी मी बोलूं लागूलों कीं, तुझ्या किनखापी ओठांनीं माझे ओठ तूं हिसकावून घ्यायचीस. त्या मुकेपणांतहि गहिरी गम्मत होती. तेव्हां मला सारखें वाटे, त्या केसांच्या वाटेनें धुंद चालत जावें आणि सगळ्या दिशा जमा कराव्या. रंगांना घट्ट कवळून ठेवावें...मी खूप अवघडलों आहे... गुदमरतो आहे...

अगदींच एकेकटें वाटूं लागलें कीं मेघ पिसाळतात हें तुला माहीत आहेच. अशा कलंदर मेघांची धांव जीवघेणी असते. आपल्याकरितां एक निःश्वाससुद्धां कुणी सोडणार नाहीं ह्या जाणीवेचा कळ खोलांत सुसाटांत जाते आणि असे आवारा मेघ शिखरावर धडकतात. धडधडणारें हृदय विदीर्ण होतें व शेंकडों सरींची बरसात कोसळते. आतां तरी बोल...नाहीं खरें वाटत तुला ? मी आपला जातोच निघून दूर कुठेंतरी... कां आतां मन डोळ्यांतून सांडवतेस ? खूप वेळ ताणून धरलें कीं, आकाशाला तडा जातो. बस अशाच आसवांच्या पागोळ्या झेलीत...काय वारा सुटला आहे. ह्या पिसाटानें मला फरफटत घेऊन जावें आणि लांबदूरवर तें सातपुड्याचें शिखर दिसतें आहे त्यावर नेऊन जोरांत आदळावें. सगळ्या बरगाड्यांचा एकदम चूर...

...अशी स्फुंदतेस कां आतां ? तोंडावर तळवा ठेवलास खरा पण त्यानें मनांत कोंडलेला उद्वेग कसा वितळणार. मला कां वेदना होत नाहींत असं वाटतं तुला ? पण दोघेहि जर प्रवाहांत सांपडलों तर सांवरायचें कुणी ? किती हौसेनें आपण वेगळा संसार थाटला. सगळीं बंधनें झुगारून अखेर एकत्र आलों. तापणाऱ्या मनावर फुंकर मारीत काळाचा ताप शमवीत आलों...जरा आरसा घेऊन चेहरा तर पहा तुझा...डोळे कसें विझूं विझूं झालेत ते ! आतां तर एवढाच प्रवास केला, नुक्ता आरंभ झालेला. धक्के हे बसणारच. म्हणून कां पाषाण बनून स्तब्ध राहायचें ! बघ तरी...बघ ना...

...मलाहि खूप वाटतं गं. आपलं बाळ जगायला हवं होतं. डोळे कित्ती छान होते तुझ्यासारखें नि ओठहि पातळ...रेखिव... सोशीक ! दोनचार महिन्यांतच किती चटका लावून गेले. नकोस रडूंस. स्वतःच कोसळल्यावर मन थोपवणार कोण ? ह्या कांहीं तासांतच कितीतरी आठवलें ! आज बरोबर एक महिना झाला नाहीं ? बाळ जायला...

किरणांच्या ओठावर ओट ठेवायचेत. अबोल आकाश हळुमुळु बोलतें आहे...

धुक्याच्या कुशींत रात्र एकजीव होते आहे...थरारते आहे !

●●●

---

पान ३९ वरून...

सिगारेट माझ्या समोर ओढण्यास मात्र तो तयार' होईना. मी फार आग्रह केला तेव्हां, आपले गांवकरी सोडून आपणच एकट्यानें ह्या 'सुखा 'चा अनुभव घेणं त्याला इष्ट वाटत नसल्याचें समजलें. रात्रीं अंगणांत बसून सर्वांच्या गप्पा चालू असतांना त्या सिगारेटचा सुखास्वाद सर्वांनीं मिळून घेण्याचा त्याचा बेत होता. हा बेत जेव्हां त्यानें मला सांगितला, तेव्हां माझ्या पाकिटांत शिल्लक राहिलेल्या आणखी चार सिगारेट मी त्याला देऊन टाकल्या. त्या आनंदाच्या भरांतच त्यानें मला कंदमुळासंबंधीची भरपूर माहिती दिली आणि नंतर स्वतःच्या घरीं मला नेऊन कांहीं कंदमुळेंहि त्यानें दिली. हीं कंदमुळें कुठें सांपडतात किंवा त्याचें झाड कसें ओळखावयाचें हें मात्र हे लोक कधींहि सांगणार नाहींत. हें गुपित जर फुटलें; तर कदाचित बाहेरचे लोक आपलें हें जंगलांतील ' अन्न ' फस्त करून टाकतील, अशी भीति त्यांना वाटत असावी ! कांहींहि असो. सिगारेटच्या मोबदल्यांत मात्र मला कांहीं नवीनच वस्तूंचा संग्रह करतां आला, एवढें मात्र खरें !

—क्रमशः

*दीपावली ' मे १९६७ च्या अंकांत प्रकाशित झालेल्या आदिवासी जमातींच्या जीवनाची खरी ओळख करून देणाऱ्या कजली वनांतील बैगा ' या रसिकतेनें लिहिलेल्या वाचनीय लेखाचा हा पुढील भाग....*

# निसर्गाच्या कुशींत अहोरात्र रंगून गेलेली

# आद्य द्राविडी जमात




—यशवंत शास्त्री

**बैगा** जमातीच्या जंगली जमातीची संख्या मैकल पर्वतांतच अधिक आहे. बाहेरच्या जगाशीं संपर्क येऊं देणें, इतर जंगली जमातीप्रमाणेंच, ह्याहि लोकांना मुळांतच आवडत नसल्या कारणानें, ते आपोआपच अलिप्त रहात आले आहेत. बैगाच्या पूर्वपीठिकेबद्दल अनेक आख्यायिका उपलब्ध आहेत. आपण मानवाचे आद्यवंशज असल्याचे बैगा दावा करतात, हें ह्या पूर्वीच सांगितलें आहे. बैगा स्वतःला कांहींहि समजत असले, तरी ते द्राविड संस्कृतींतील अवशेष असल्याचे आज संशोधनानें सिद्ध झालें आहे. द्राविडी संस्कृतींतील कित्येक शाखा नंतर सुधारल्या परंतु मूळ जंगली जमातीचें हे मैकल पर्वतराजींतील आजचे मानवी अवशेष पूर्वी तसेंच कायम राहिले आहेत. त्यांच्या ह्या क्षेत्रांत जाऊन पाहिल्यानंतर आद्य द्राविडी जमातीची कल्पना सहज करतां येईल. मंडला जिल्ह्यात प्रामुख्यानें व बालघाट व बिलासपूर जिल्ह्यांतही कांहीं प्रमाणांत बैगांचें वास्तव्य आहे. सातपुडा पर्वताच्या पूर्वेकडील श्रेणींत हजारों वर्षांपासून नांदणाऱ्या ह्या जंगली जमातीनें स्वतःचें जंगली वैभव आणि संस्कृति आजहि कायम ठेवली आहे.

छत्तिसगड व संबलपूर विभागांत 'बिजाली' व ' बिजावर ' अशा दोन जमाती आज आढळतात. त्यांनीं हिंदु धर्माचा स्वीकार केलेला असला, तरी हेच लाक मंडला जिल्ह्यांतील आजच्या बैगा लोकांचेच वंशज असावेत, असा संशोधकांचा तर्क आहे. ह्या बैगा जमातींतूनच 'राज-गोंड ! व 'राजकोरकू' यांची निर्मिती झाली व हिंदु समाजांत ते सामिल झाले. बिजावर जमात मात्र ह्यापासून अलिप्त राहिली व तिची गणना आजहि बैगा जमातींतच होते. ' राय–भैना' व 'खात–भैना' ह्या बैगांच्या दोन उपशाखा आहेत. पैकीं दुसऱ्या शाखेंतील लोक बालाघाट जिल्ह्यांत अधिक आहेत आणि पहिल्या शाखेंतील लोक मंडला जिल्ह्यांत विखुरले आहेत.

डिंडोरीचा कांहीं सपाट प्रदेश वगळल्यास, जेथें अरण्य नाहीं असा विभाग उभ्या मंडला जिल्ह्यांत आढळणार नाहीं. बैगा जमातींतील लोक बाहेरच्या जगाशीं आपला संपर्क येऊं देत नाहींत, हें सांगितलेंच. त्यांच्या ह्या वृत्तीमुळें त्यांनीं अंतर्गत जंगलांतच आपल्या वसाहती केल्या आहेत. सालवृक्षाची हिरवीगार अरण्यें सर्व दूर उभीं आहेत. हे वृक्ष बाराहि महिने हिरवे असतात. निवास तहसिलींतील घनदाट अरण्यांत बैगांची जशी वसती आहे, तशी त्यांनीं आपली वसती मोतीनालापासून तो थेट अमरकंटकपर्यंतच्या घनदाट अरण्यात केली आहे. ह्या दुसऱ्या विभागांतच ( डिंडोरी तहसील ) ' बैगाचक ' नामक विभागाची निर्मिती इंग्रजांच्या अमदानींत केली गेली. हा स्वतंत्र विभाग निर्माण करणें इंग्रजांना भाग पडलें होतें. आणि ह्याचें कारण म्हणजे, बैगा जमातींत असलेली ' बेवार ' ( दहिया ) पद्धत होय. बैगांच्या जीवनांत ' बेवार ' ला अत्यंत महत्वाचें स्थान आहे. जंगल जाळून तेथें शेती करण्याच्या पद्धतीला बेवार म्हणतात. इंग्रजीत ह्यालाच ' शिफ्टिंग कल्टिव्हेशन ' असें नांव आहे. बेवारला ह्या लोकांत एक प्रकारचें धार्मिक स्वरूपहि आलेलें आहे. मी अधिक चौकशी केली तेव्हां, ही बेवार पद्धति जशपूर, बस्तर, आसाम, ओरिसा प्रभृति प्रदेशांतहि रानटी जमातींकडूनच अंगिकारली जाते; इतकेंच नव्हे, तर फ्रान्स, बेल्जियम, ब्रह्मदेश, आफ्रिका प्रभृति देशांतील रानटी जमातीहि बेवारचा अंगिकार करीत असल्याचें समजलें. बेवारमुळें जंगलांचें अपरिमित नुकसान झालें आहे आणि हें असेंच चालू राहिलें तर आहेत तीहि जंगलें कांहीं वर्षांतच नाहींशीं होतील असें वाटून इंग्रजांनीं सातपुड्याच्या कुशींत ' बैगाचक ' निर्माण केला होता. ' चक ' चा हा विभाग २४००० एकराचा आहे व तो १८९० सालीं निर्माण केला गेला. हा 'चक' म्हणजे बैगांचेंच राज्य आहे. बेवार करण्यास इतरत्र बंदी असली तरी तो कायदा ह्या विभागाला लागू नाहीं. जंगल जाळून बेवार करण्यास बैगांना येथें पूर्ण मोकळीक आहे. ह्या ' चक ' मधील रानटी जनावरें पूर्णतः नाहींशीं झालीं आहेत. बैगांच्या कुऱ्हाडीनें अथवा धनुष्य–बाणानें त्याचा फडशा पाडला गेला आहे. बैगाचक सरकारनें मुद्दाम निर्माण केला म्हणून त्यांत सर्वच बैगा येऊन राहिले असें मुळींच नाहीं. फार थोडीं बैगा कुटुंबें तेथें वास्तव्य करून राहिलीं आहेत. इतरत्र जे बैगा आहेत, त्यांना बेवार –प्रतिबंधक कायद्याला नमावें लागत असलें तरी चोरून मारून त्यांचा तो उद्योग चालूच असतो. त्यांचा बेवार करण्याला आळा घालणें कठीण आहे.

धरतीमातेच्या पोटांत नांगर खुपसणें बैगांच्या धर्माला संमत नाहीं. बेवारची पद्धत







अनुक्रमणिका

कशी अंगिकारली गेली ह्यासंबंधीच्या कांहीं चमत्कारपूर्ण आख्यायिकाहि ऐकायला मिळतांत. बैगांच्या समजुतीप्रमाणें त्यांचे आद्य पुरुष नंगा बैगा व नंगी बैगी भूमितलावर अवतरल्यानंतर ‘ तुम्ही तुमची उपजीविका कशी करणार ?’ असा ईश्वरानें त्यांना प्रश्न विचारला आणि त्यांनीं उत्तर दिलें, ‘ जंगलांतील झाडें जाळून आम्ही आमची उपजीविका करूं ! ’ त्यांना दोन मुलें होतीं. त्यापैकीं थोरल्या मुलानें एका दिवसांत दोन हजार साल वृक्ष कापून टाकले. नंतर ईश्वरानें त्या झाडांच्या झालेल्या रक्षेंत (राख) कुटकीचें ( एक भाताचा कनिष्ठ प्रकार) दाणे टाकण्यास सांगितलें. ह्या उपक्रमानंतर कांहीं महिने झोंपून राहण्याचीहि आज्ञा त्यांना ईश्वरानें दिली. त्याप्रमाणें ते झोंपलें व कांहीं महिन्यांनीं जागे होतात तोंच त्यांना सर्वत्र भाताचीं शेतेंच शेतें उगवलेलीं दृष्टीस पडलीं. ह्या वेळेपासून बैगा लोकांनीं बेवार पद्धत शेतीसाठीं अंगिकारली. ह्या आख्यायिकेंत अर्थातच अंधविश्वासाचा प्रकार आहे. ह्या अशा अनेक आख्यायिका असल्या, तरी धरतीमातेच्या पोटांत नांगर खुपसून पाप करावयाचें नाहीं, हीच भावना ह्या रानटी लोकांत प्रबळ आहे.

खरें पाहिलें तर बैगा हा कांहींसा ऐदी आणि आळशी इसम आहे. होईल तितकें कष्ट टाळावें ह्या त्याच्या वृत्तीमधून बेवारची पद्धत निर्माण झाली आहे आणि त्या पद्धतीला त्यांनीं धार्मिक आवरण दिलें आहे. बेवार करण्याचेंहि ह्या लोकांचें एक शास्त्र आहे. चांगल्याशा पहाडाच्या उतरणीवरील दोन ते तीन एकर दाट जंगल हे लोक जाळून टाकतात. जाळण्यापूर्वी जंगलांतलीं झाडें तोडून टाकतात व नंतर त्यांना आग लावण्यांत येते. जंगल तोडण्याच्या उपक्रमास मे महिन्याच्या सुमारांस सुरुवात होते. जळालेल्या लाकडांची राख नंतर जमिनीवर सारखी करण्यांत येते. पावसाळा सुरूं होण्याच्या किंचित अगोदर ह्या पसरलेल्या राखेंत कोदो, कुटकी, बैगनी तूर, रताळी वगैरेंचें बीं टाकण्यांत येतें. पावसाळ्यानंतर तेथून विपूल पिक निघतें. बेवार केलेल्या एका जागीं तीन ते चार वर्षें अशा रीतीनें पीक काढतां येतें व नंतर मात्र त्यांना दुसरें जंगल जाळून पुढील तयारी करावी लागते. सर्वसामान्य शेतीच्या पद्धतीमुळें होणाऱ्या पिकापेक्षां, बेवार केलेल्या जमिनींत दुप्पट पीक निघते, असा अनुभव आहे.

बेवारच्या ह्या पद्धतीमुळें जंगलांचें नुकसान होतें, हें खरें आहे. त्यासाठीं सरकारनें प्रतिबंधक कायदा केला हेंहि योग्य झालें. ह्या कायद्यामुळें कांहीं बैगांनीं आतांशा नांगरानें शेती करण्यास कुठें कुठें सुरुवात केली आहे. पण नांगर धरणाऱ्या अशा बैगा शेतकऱ्यांची संख्या थोडी आहे. मी स्वतः जो प्रकार पाहिला आणि ‘ बैगाचक ’ बाहेरील कांहीं बैगा लोकांशीं बोललों तेव्हां बेवार पद्धतीला संपूर्ण आळा घालणें अशक्य आहे, अशीच माझी समजूत झाली होती. जेथें बेवार अगदींच बंद झाली आहे आणि अधिकारीवर्ग डोळ्यांत तेल घालून बसला आहे, तेथील बहुतेक बैगा दुसरीकडे निघून जातात आणि ज्यांना शक्य नसते, ते बिचारे केवळ कंदमुळांवर आपली गुजराण करतात. गेले कित्येक महिने कंदमुळांवर गुजराण करून राहणारे; पण नांगरलेल्या जमिनींतील अन्नास स्पर्श न करणारे कांहीं बैगा लोक, मी निवास तहसिलींत प्रवास करीत असतांना पाहिले आहेत.

बेवारच्या पद्धतीला प्रतिबंध करण्याचा पहिला प्रयत्न १८६७ सालीं करण्यांत आला. हा प्रयत्न यशस्वी झाला नाहीं. त्यानंतर आत्तापर्यंत झालेले सर्व प्रयत्न असेच अयशस्वी होत गेले; आणि वास्तविक पाहतां बेवारचा जो इतका बाऊ केला जातो, तो व्यर्थ होय, असें वाटूं लागतें. बेवारमुळें जंगलांचें तात्पुरतें नुकसान होतें हें खरें; पण बेवार केलेली जमीन ही पहाडाच्या उतरणीवरील जमीन असते. उतरणीवरील जळालेल्या साल वृक्षांचीं मुळें अधिक जोरानें धरतात व त्यांची वाढ सपाट्यानें होतें, असें कांहीं तज्ञांकडून मला सांगण्यांत आलें. जेथें बेवार केले गेलें आहे अशा जागीं पांच–सहा वर्षांत शेंकडों सालवृक्ष उगवल्याचें मी प्रत्यक्ष पाहिलें आहे. अशा स्थितींत बेवार करण्यावर कायद्यानें प्रतिबंध घालणें ही गोष्ट अव्यवहार्यच ठरत नाहीं काय ? हे लोक अजाण आहेत. पण जंगलांचें पोषण करावें ह्याचीहि त्यांना जाणीव आहे. जंगलांचा नाश होऊं नये म्हणूनच ते पहाडाच्या उतरणीवरील जंगलांत बेवार करतात. अशा ठिकाणीं बेवार झालेल्या जागेंत पुढें दुपटीनें जंगल वाढते ह्याचीहि त्यांना जाणीव आहे. अशा स्थितींत मागासलेल्या ह्या जमातीच्या धार्मिक भावना दुखविणें अथवा त्यांना त्यांच्या आर्थिक व्यवस्थेपासून दूर लोटणें इष्ट ठरणार नाहीं. बेवार हें बैगाच्या जीवनाचें प्रमुख अंग आहे. ह्याबाबत त्यांच्यावर फार बळजबरी झाली, तर त्याचे अनिष्ट परिणाम होण्याचींहि चिन्हें दिसतात.

बैगा जमातींतील लोक जसे वृत्तीनें साधे आणि व्यवहारांत इमानदार आहेत, तसेच ते निसर्गसौंदर्यासाठींहि आसुसलेले आहेत. बैगाचें गांव मोठ्यांत मोठें असेल, तर तें केवळ पंधरावीस झोपड्यांचें व लहानांत लहान गांव तीन झोंपड्यांचें सुद्धां असतें. पण बोंदरहून जलदाबोनाकडे जाणाऱ्या जंगली रस्त्यावरून जातांना मी एका घराचें सुद्धां एक गांव पाहिलें आहे ! ह्या एका घराच्या गांवकऱ्याजवळ मी मुद्दामच चौकशी केली. तेव्हां गांवकऱ्यांनीं वाळींत टाकलें म्हणून ह्या झोपडींतील कुटुंबानें आपलें स्वतःचें वेगळें गांव वसविल्याचें समजलें ! आमच्या शहरीं गांवांत रहाणाऱ्या कुटुंबांत भांडणें झालीं, तर एका घराचीं दोनच घरें होतात; पण बैगा कुटुंबांत आपसांत जर भांडणें झालीं, तर एका कुटुंबासाठीं एक खास गांव निर्माण होऊं शकते ! आपलें गांव वसविण्यासाठीं हे बैगा जी जागा निवडतात, ती जागा निसर्गसौंदर्यानें हटकून संपन्न असते. दोन-तीन घरें प्रत्येक दिशेला मिळून घरांचा एक सुंदरसा चौकोन अथवा बऱ्हशीं वर्तूळ केलेलें असतें. मधोमध मोठें अंगण असते. गांवाच्या जवळपासच कुठेंतरीं एकादीं नदी अथवा ओढा असतो. सायंकाळचें जेवण आटोपलें कीं, गांवाच्या मधोमध असलेल्या अंगणांत स्त्री-पुरुष एकत्र बसून गप्पा मारतांना दिसतील. हिवाळ्यांत ह्याच ठिकाणीं त्यांची शेकोटी पेटलेली असते आणि भोंवतीं रात्ररात्रभर नृत्य, गाणीं चालूं असतात.

बैगाच्या घरांत तुम्हीं डोकावून पहा. एका दाराचें घर. आंत एकच खोली. समोर छोटासा व्हरांडा. घराला खिडकी नाहीं. हें घर वेळूचें तयार केलेलें असतें आणि त्यावर मातीचा गिलावा असतो. व्हरांड्यावर झाडांच्या पानांचें अथवा गवताचें छत असतें. घरांत पाणी भरून ठेवण्यासाठीं मातीचें एक मडकें. जेवणासाठीं पळसाचीं पानें. पिण्याची दारू भरलेलीं कांहीं छोटीं छोटीं मडकी. एकादी छोटीशी लांकडी पेटी. झोपण्यासाठीं चटई.





एक कुऱ्हाडें, एक कोयता, एक भाला आणि धनुष्य–बाण: हांच काय तो एका बैगा कुटुंबाचा संपूर्ण संसार ! धनुष्य–बाणाचा उपयोग हे लोक फारसा करीत नाहींत. धनुष्य–बाण बाळगून जंगलांत जाण्यास सरकारनें मनाई केली आहे. तशी मनाई करण्यास कारण आहे. एकट्या 'बैगाचक' विभागांत तुम्हांला जंगली प्राणी फारसे आढळणार नाहींत. बैगांनी त्यांचा केव्हांच फडशा पाडला आहे. जंगली जनावरांचें रक्षण व्हावें म्हणूनच तीरकमठ्याच्या वापरास मनाई आहे.

ही झाली खास बैगांच्या गांवांची गोष्ट. इतर जमातींच्या लोकांची वसती असलेल्या गांवांत जर कांहीं बैगे रहात असतील, तर त्यांनीं गांवापलीकडे आपली निराळी छोटीशी वस्ती–वरीलप्रमाणें–केलेली आढळेल. इतर जमातींत मिसळून एकत्र राहणें त्यांना आवडत नाहीं. ते त्यांना निषिद्धसुद्धां वाटतें. त्यांची दुनियाच न्यारी ! अत्यंत इमानदार आणि सत्यवचनी असलेला बैगा, आपल्या घराइतकाच रहाणीनेंहि साधाच असतो. एक लंगोटी, आणि असली तर डोक्याला छोटीशी चिंधी म्हणून मुंडासें. एवढाच त्याचा पोषाख. स्त्रिया मात्र लुगडे नेसतात. लुगड्याचा कासोटा असतो आणि त्याचाच एक पदर अंगावर घेतलेला असतो. ती लुगडें नेसत असली, तरी मांड्यापासूनचें संपूर्ण शरीर उघडेंच असतें. लुगडें त्या विशिष्ट पद्धतीनें नेसतात. शेतावर काम करीत असतांना, त्यांचें मूल, त्या लुगड्याच्या पदराच्या सहाय्यानें, पाठीशीं सफाईनें बांधतात. अशा रीतीनें पाठीशीं मूल बांधून ही स्त्री दिवसभर राबत असते. स्त्रिया स्वतःच्या अंगावर भरपूर गोंदून (Tattoo) घेतात. पांच वर्षांच्या मुलीला प्रथम केवळ कपाळावर गोंदलें जातें. ती शहाणी झाली कीं, लग्नापूर्वी मात्र तिच्या मानेपासून तो संपूर्ण शरीरावर गोंदण केलें जातें. गोंदणें म्हणजे त्यांचा एक अलंकारच होय. शिवाय गोंदून घेतल्यानंतर स्वास्थ उत्तम राहते व भूत–पिशाच्चाची बाधा होत नाहीं, अशीहि त्यांची समजूत आहे.

थंडीच्या दिवसांत हे लोक कसे काय करीत असतील, असा प्रश्न वाचकांसमोर उभा राहील. अंगणांत शेकोटी जळत ठेऊन त्या भोंवतीं हे लोक झोपतात व थंडीपासून बचाव करून घेतात. विस्तवाच्या ठिणग्यांना त्यांचें शरीर सरावलेलें असतें. एके ठिकाणीं मिशनऱ्यांनीं ह्या लोकांना उबदार कांबळें पांघरण्यास दिलें. कांबळ्यांचा त्यांनीं उपयोग केला; पण दुसऱ्या दिवशीं पाहतात, तों त्या कांबळ्यांवर विस्तवाच्या ठिणग्या पडून त्यांना भोकें पडलीं होतीं ! यावरून विस्तवाच्या ठिणग्यांना त्यांचें शरीर कसें सरावलेलें असतें, याची कल्पना येईल. या शिवाय दारूमुळें सुद्धां थंडीचा प्रतिकार ते करीत असतात.

बैगा पुरुष हा वंशानें आळशी असतो. अगदींच अडून राहिल्याशिवाय तो काम करण्यास सहसा धजणार नाहीं. कित्येकदां घरांतील कोदो-कुटकी संपून जाते. घरांत दुष्काळाची परिस्थिति निर्माण होते तेव्हां कुठें बैगा जंगलांत जाऊन कंदमुळें शोधून आणतो. कांही कंदमुळें आश्चर्यकारक असतात. एक कंद तर असा असतो कीं जो पाण्यांत उकडून खाल्ला कीं पंधरापंधरा दिवस भूकच लागत नाहीं. घरांत अन्न नसलें कीं हे लोक अशा रीतीनें आपली भूक भागवून घेतात. कित्येकदां तर चार चार महिने हे लोक केवळ कंदमुळें खाऊन रहात आले आहेत. भुकेप्रमाणेंच तहान भागविण्याचेंहि असेंच साधन ह्या लोकांजवळ आहे. कोणत्याशा झाडाची साल ते सतत आपल्या घरांत बाळगतात. ह्या सालीचा एक तुकडा तोंडात ठेवला कीं, तो तुकडा तोंडांत असेतोंपर्यंत तहान म्हणून लागतच नाहीं. माझ्या प्रवासांत नेली हा साल एका बैग्यानें दिली होती व तिचा प्रयोगहि मी उन्हांतान्हांतून हिंडतांना करून पाहिला. एका सालीच्या तुकड्यावर मी भर उन्हांत सहा तासपर्यंत पाण्याशिवाय काढले आहेत. ही साल आणि कांहीं कंदमुळें मी परत येतांना सोबत आणली आहेत. ह्यापैकीं एक कंद अगदीं रताळ्यासारखा असतो. तो कंद फोंफाट्यांत टाकून भाजावा व नंतर फोडावा. त्यांतून डाळिंबाच्या दाण्यासारखे सफेद रंगाचे भरपूर दाणे बाहेर पडतात. हे दाणे भातासारखे खाऊन पोट भरता येते व तो 'भात' फारच खमंगहि लागतो. हा कंद जमिनींतून काढल्यावर फार दिवस टिकत मात्र नाहीं. सालम नांवाची एक मुळी असते. ही मुळी ओली असतांना खाल्ली कीं दिवसभर तुम्हांला भूक लागणार नाहीं किंवा तहानहि लागणार नाहीं. ती जर वाळलेली असेल, तर तिचें पीठ सत्तूच्या पिठासारखें होतें. परंतु वाळलेल्या मुळींत तहान शमविण्याचें सामर्थ्य मात्र उरलेलें नसतें. ती केवळ भूकच शमवूं शकते. जलदा बोना येथील एका बैग्यानें माझ्यावर खूष होऊन मला कांहीं कंदमुळें 'नजर' केली होती. त्यानें माझ्यावर खूष होण्यास फार मोठें कारण घडलें नाहीं. मी त्याला एक सिगारेट दिली आणि त्याचा मी फार मोठा सन्मान केला, असें वाटून तो हर्षातिरेकानें अक्षरशः नाचत सुटला. दिलेली



विवाहबद्ध 'बैगा' तरुण–तरुणींचीं हीं दोन मनें

...पान ३६ वर



-प्र. ना. पेंढारकर



*....इतके दिवस आपण प्रेमाशिवाय कसें राहिलों ह्याचें तिला नवल वाटते. बोलण्यासाठीं ओठ हलतात. मनांत एक हुरहूर असते. शब्द ओठावर येतात... पण ती त्याच्या जवळ गेल्यावर मात्र अस्पष्ट किंचाळते,.. कारण त्याचे.....*

**मुक्ता** दररोज आपल्या टुमदार बंगल्याच्या कठड्याला रेलून उभी राहते. समोरच असलेल्या दूधकेंद्राचा गडद निळा रंग रोजरोज पाहून तिचं डोकं उठतं. मनांतून ती चिडते संतापते. असल्या 'भुक्कड' रंग योजनेवर तुच्छतेनें बोलून स्वतःची कलासक्ती इतरांपाशीं बोलून दाखवावी असं तिला राहून राहून वाटतं.

दुपारचे दोन वाजले कीं लोकांची गडबड सुरू होते. दगड, बाटल्या ह्यांची लांबच लांब रांग लागते. रस्त्याच्या एका कडेला सावलीचा आधार घेत बायकापोरं गोंगाटांत वेळ घालवितात. दुधाची गाडी लवकर येत नाहीं म्हणून शिव्या देत रहतात आणि गाडी आली कीं सावलीचा आधार सोडीत, एकमेकाला धक्के देत, प्रखर उन्हांत उभीं राहतात. नंबरावरून भांडत सुटतात.

तारेच्या जाळ्यांत अडकविलेल्या बाटल्या एकमेकांवर आदळतात अन् मग त्यांचं खळखळलेलं हास्य मुक्ताला तसंच कठड्यावर रेलून ठेवतं.

सुखांत झुरणाऱ्या मुक्ताला हे घामाळलेलें–कातावलेले बायकापोरांचे चेहरे पाहून शिसारी येते. आपल्यासारखं ह्यांचं आयुष्य सुखी नाहीं, संथ नाहीं ह्याची तिला खंत वाटते.

रस्त्याच्या कडेला, भर उन्हांत एक गोंडस मूल आपल्या निस्तेज आईचे स्तन चोखीत असलेलें ती पाहते. आणि मग तिला स्वतःलाच शोषल्यासारखं वाटूं लागतं.

फळफळलेल्या तारुण्यापासूनचा काळ ती मग मोजते आणि मारलेल्या असंख्य फुल्यांची संख्या तिला बेचैन करते, फुल्यांच्या पखाऱ्यांत तिचं तारुण्य अस्पष्ट होतं, अन् त्या फटफटींत निस्तेज बाईचे चोखलेलें स्तन तिला सतावून सोडतात. गोंडस चेहरा, निस्तेज स्तन...असंच मग ती कांहींतरीं मनांतल्या मनांत पुटपटतें.

बाटल्यांच्या खळखळाटांत गोंधळाची बेरीज होते. कठीण बेरीज. आणि शेवटीं वैतागलेला दमदार आवाज सर्वांना शून्यावर आणून सोडतो.

एका क्षणांत एवढीं मोठीं वजाबाकी करणारा व सर्वत्र शांत वातावरण निर्माण करण्याचं सामर्थ्य असलेल्या त्या आवाजाच्या दिशेनें मुक्ता आपली नजर वळविते...

तो आवाज तिला आवडत नाहीं. पण तें सामर्थ्य तिला आकर्षित करतं...

ती मग त्याच्याकडे दररोज एकटक पाहूं लागतें. दुपारचे दोन वाजले कीं तिची चूळबूळ सुरू होते. ती शेवटीं त्याच्या दर्शनानेंच थंडावते.

कठड्याला रेलून ती त्यावेळीं उभींच असते. वेड्यावाकड्या पडत असलेल्या फुल्यांचा जलद चाललेला हात ती पाहते रोजच. अन् मग ती स्वतःशीच पुटपुटतें...एक काई...एक फुली...

जलद चाललेल्या हातांनीं पडत असलेल्या फुल्या ती मोजूं लागते. दोन, तीन, चार...

...अन् मग नकळतच तिच्या तोंडून दोन देशमुख, तीन जोशी, चार कुलकर्णी...पांच...ती थांबते. विचार करते. पुढची असंख्य नांवें तिला आठवत नाहींत. आठवण्याचा ती प्रयत्नहि करीत नाहीं...

समोर जलद चाललेल्या हातांनीं फुली पडते व त्याचवेळीं त्याच्या भडक्या आवाजानं उठलेली लहर मुक्ताला आपल्या पहिल्या फुलीवर आणून सोडते...

आरशांतील आपल्याच रूपाशीं सदैव बोलत असलेल्या मुक्ताला त्यावेळीं अगदीं प्रथमच 'पहिला आलेला' भडभंड आठवतो... आपल्या मुसमुसलेल्या तारुण्याचा उपभोग घेण्याचा दिवस आतां जवळ आला...आपण पसंत पडलों तर...ह्याची त्यावेळीं तिला जाणीव होते.

आईनें तिला अगोदरच ह्या श्रीमंत अन् सुंदर 'स्थळाची' माहिती दिली असते. त्यावर ती स्वतःच्या भावी आयुष्याचे मनोरे बांधीत असते...

आणि म्हणूनच 'भडभंडे' ज्यावेळीं प्रथम आला त्यावेळीं ती त्याला दाराआडून पाहून घेते. त्याचें बळकट शरीर व श्रीमंतीचा तजेला ह्याचा दुरूनच अदमास घेते.

बाहेरच्या गप्पांना रंग चढलला असतो. अशावेळीं ती चहाचा ट्रे घेऊन आंत येते. पहिलाच प्रसंग. त्यांत थोडीशीं भीति, थोडीशीं लाज...आणि मग विचारलेल्या प्रश्नांचीं दिलेलीं अस्पष्ट उत्तरें...वाचण्यापासून चालण्यापर्यंत...त्याच अर्धमेल्या लाजेनं चूर होऊन ती ट्रे घेऊन परतू लागतें. पण अडखळतें. ट्रे निसटतो. फुटलेल्या कांचेचे तुकडे गोळा करता करता ती हळूच 'पाहण्यास' आलेल्यांकडे पाहते. त्याचवेळीं त्याच्या कपाळावर उमटलेल्या तिरस्काराच्या आठ्या व चेहऱ्यावरील तुच्छता ती टिपून घेते. एवढीं साधी गोष्टहि सहन करू न शकणाऱ्या, श्रीमंतीच्या तोऱ्यांत असलेल्या भडभंडेवर ती मनांतून नाराज होते व मग नकळतच ती आंतल्या आंत पुटपुटते, भडक्या भडभंड !–फुली !

त्यांच्याकडून 'पसंतीचं' उत्तर येऊनहि मुक्ता अगदीं पहिल्या प्रथमच स्वतःकडून नकार देते. आपल्या आई–वडिलांच्या विनविण्यांना न जुमानतां आणि मग कोणत्यांहि क्षुल्लक कारणावरून सांगून येणाऱ्या 'स्थळांना' नकार देण्याचं तिला व्यसनच लागत.

आपल्या सौंदर्यांत सदैव चूर असणारी मुक्ता मग भव्य कल्पनांशीं खेळ खेळतें. एक अति सुंदर–स्वतःप्रमाणें, श्रीमंत आपणाहून अधिक, हुषार–आपल्या इतका...अशा तरुणाची मनोमन आखणी करते.

दिवस जातात–महिने जातात पण पाहिजे असलेलं 'चित्र' अनेक 'याद्या' हुडकूनहि मुक्तासाठीं मिळत नाहीं. मग आई–वडील चिडतात. संतापतात. ह्यापुढें तुझ्यासाठीं मुळींच प्रयत्न करणार नाहीं एवढंहि सांगून मोकळे होतात. पण मुक्ता अचल राहते. आपण आपल्या सौंदर्यावर–संपत्तीवर आपल्या अपेक्षेप्रमाणें मुलगा मिळवूं ह्याची तिला खात्री असते...

...असेंच महिने जातात. वर्षें जातात. जाणारी वर्षें मुक्ताच्या वयांत भर टाकीत जातात. वयाच्या भारांनीं मुक्ताचें सौंदर्य वाकूं लागतें. डोळ्यांभोवतीं पडणारीं काळीं वर्तुळं तिच्या वयाचा ठसा उमटवूनच जातात.

सदैव आरशांत पाहून आपल्याच चेहऱ्यावर खूप असणारी मुक्ता हें नवं रूप पाहून जराशीं बावचळतें. आपल्या वयाचा विचार करते. आपल्याला 'अठ्ठावीस' पूर्ण झाली याची आज तिला प्रकर्षानं जाणीव होते व आपल्या काळ्या वर्तुळांना पावडरीचा लेप देत देत ती मनाशीच म्हणतें, 'ह्या वर्षीं तरी माझी अपेक्षा पुरी होणार'...

आई-वडिलांच्या आग्रहाखातर, त्यांनीं लाज सोडून, पुन्हां एकदां दाखविलेल्या 'यादीवर' ती उगाचच त्यांच्या समाधानासाठीं नजर फिरविते व तशींच त्यांच्याकडे परत देते.

आई चिडते. गप्प बसते. वडील संतापतात अन् मग काकुळतेनें विचारतात, 'मुक्ता, काय झालंय तुला ? आम्ही दाखवितो तीं सारींच 'स्थळं' तूं विचारांतच कां घेत नाहींस ? तुझं चांगलं व्हावं असं कां वाटत नाहीं आम्हांला ? कारकुनाला तूं कारकुंडया म्हणतेस व नको म्हणून सांगतेस. धंदेवाला माणूस दाखवला तर तो वेळेवर घरीं येत नाहीं म्हणून नको म्हणतेस, एखादा कलाकार सुचविला तर तो सदा दरिद्री म्हणून त्याला हिणवतेस...तुला कारकून नको, कलाकार नको, धंदेवाला नको...मग पाहिजे तरी कोण ? तूं अशा स्वतःविषयीं काय कल्पना करून बसली आहेस अजून ? तुझं रूप तूंच नीट बघ...विचार कर. प्रथम टीक होतं. पण आज मीहि तुझा बाप असून सांगतों कीं तूं निश्चित आतां सुंदर नाहींस...'बरी' सुद्धां नाहींस...तुला काय करायचं तें तूं कर. मला सांगावसं वाटलं म्हणून सांगितलं. मी दिलेल्या 'यादीचा' तूं जराहि विचार केला नाहींस म्हणून एवढं बोललों....

वडिलांच्या याहि बोलण्याकडे मुक्ता अगदींच दुर्लक्ष करते व आपल्या स्वप्नांत रंगून जाते.

अशींच कांहीं वर्षे पांखरांच्या पंखाप्रमाणें गळून पडतात.

मुक्ता कठड्याशीं रेलून विचार करते. आज आपलं वय किती ? एकतीस ! ती दचकते. कांहीं वर्षांनीं मी अशीच तर नुसती स्वप्नांतच रंगून म्हातारी होऊन जाणार नाहीं ना ? तिच्या अनेक मैत्रिणींचे चाललेले सुखाचे संसार ती आठवते......तिला स्वतःच्याच एकाकीपणाची तीव्र जाणीव होते. ...स्वप्नांतील कल्पना बारगळतात व मग समोर काम करणारा तरूण पुरुष आपल्याकडे नेहमीप्रमाणेंच रोखून पाहतोय ह्याची तिला जाणीव होते...तीहि धीटपणें त्याच्या डोळ्याला डोळा भिडवते. किंचित् हंसतें...दुपारचे दोन वाजले कीं बाहेर गडबड सुरूं होतें. आदळआपट होते. अन् त्यासरशीं मुक्ताहि कठड्याला रेलून उभी राहतें. अगदीं रोज. समोरच्या तरुणाकडे पहात...आपल्यांत कांहींतरी बदल होतोय्. कसली तरी ओढ आपल्याला खेचून नेतेय् असं तिला वाटूं लागतं. ती स्वतःशींच विचार करते, 'प्रेम, प्रेम म्हणतात तेंच तर हें नव्हें ना ?

प्रेमाच्या नुसत्या कल्पनेनेंच ती शहारून जाते. हा अनुभव अगदीं नकळतच ती प्रथमच घेते...आपलं त्याच्यावर प्रेम बसत चाललंय् ह्याची तिला खात्री पटते...त्याच्या दृष्टीला दृष्टी भिडविण्यांत ती आनंद मानून घेते. त्यासाठीं भावी पतीविषयीं पूर्वीपासून उभारलेलीं सुंदर चित्रें ती पुसून टाकण्यास तयार होते.

...दयेनें तिचं मन भरून येतं व समोरील काम करणाऱ्या गरीब तरुणाचा आपण उद्धार करणार आहोंत ह्याच कल्पनेनें ती मोहरून जाते...साऱ्या गरीब लोकांविषयीं तिला अनुकंपा वाटूं लागते. आपल्यासारखं या लोकांचं आयुष्य सुखी नाहीं, संथ नाहीं ह्याचीच तिला खंत वाटते...

समोर पडत असलेल्या फुल्यांचा जलद चाललेला हात पाहिला कीं मग ती नकळतच पुटपुटते...दोन देशमुख, तीन जोशी, चार कुलकर्णी...पांच...सहा...पुढची असख्य नांवं आठवण्याचा ती प्रयत्नहि करीत नाहीं. आजपर्यंत मारलेल्या ह्या असंख्य फुल्या पाहून ती 'स्वतःशीच म्हणतें...' नाहीं, नाहीं. ह्या माणसावर मात्र मी निश्चित फुली करणार नाहीं...माझं प्रेम जडलंय त्याच्यावर, प्रेम जडलंय ! तो गरीब आहे...मी त्याला सुखी करणार आहे...भरपूर पैसा आहे माझ्यापाशीं. तो कितीहि शिकला असूं दे. चालेल मला...कारण मी प्रेम करतेय, प्रेम !...

मुक्ता भानावर येते. त्यांना आपल्या विषयीं काय वाटत असेल ह्या विचारांनीं अडखळते...

कांहीं वाटत असलं तरी आज त्यांना कांहींहि करून गाठायचं, त्यांच्याशीं निदान दोन शब्द बोलायचें...चेहरा हंसरा ठेवून...असं ती मनाशीं पक्क करून टाकतें.

बोलण्याच्या नुसत्या कल्पनेनेंच तिचा झाकळलेला चेहरा उमलून निघतो व ती 'सेंटर' बंद होईपर्यंत वेळ काढण्यासाठीं म्हणून रेडिओच्या बटनांशीं चाळा सुरूं करते...

इतका वेळ चाललेली गडबड-धांवपळ थांबते. पुन्हां सारा शुकशुकाट होतो. मुक्ता पुन्हां कठडयाशीं बोलून सेंटर बंद होण्याची वाट पाहते.

सेंटरला कुलूप लागतं व तो तरुण तसाच रेंगाळत रेंगाळत इकडे तिकडें पहात हळूंच मुक्ताकडे पाहतो. मुक्ताहि त्याच्याकडे पाहते.

तिच्या मनांत आतां फक्त एकच एक विचार असतो. बस्स, त्याला गाठावयाचं. त्याच्याशीं बोलायचं. ह्याच एका विचारानें तिचीं पावलं जिन्याच्या अनुरोधानं उतरूं लागतात. अंतःकरणांतील धगधग, धडधड तिला स्पष्ट जाणवते...

मनांत विचारांच्या लाटा फुटत असतात. त्याच्या जवळ जाऊन कसं बोलायचं-हंसायचं ह्याचांच ती त्या क्षणीं विचार करूं लागते. आजपर्यंतची तिची मेलेली उत्सुकता आज जिवंत होते. पायांना पंख फुटतात व ती परीसारखी एका उंच स्थानावर जाऊन बसते.

त्याच्या विषयींच्या मनांतल्या कल्पनांना ती आज उघड स्वरूप देऊं पाहतें. तिचं अंतःकरण उदारतेनें भरून येतें व एका गरीब, अगदीं गरीब अशा माणसाचा आपण आज उद्धार करणार आहोंत ह्या कल्पनेनेंच ती बहरून जाते. आजपर्यंत फुल्यांच्या पसाऱ्यांत तिनं हा अनुभव घेतला नसतो. इतकीं वर्षे आपण प्रेमाशिवाय कशी काय फुकट घालविली ह्याचं मग तिला आश्चर्य वाटतं.

आतां तिला क्षणाचाहि विलंब नको असतो. ती त्याच गडबडींत जिन्याच्या पायऱ्या उतरूं लागतें...ती लगबग, ती आतुरता... सारं सारं कांहीं तिला नवीन असतें. आयुष्यांतला एवढा मोठा क्षण आज आपल्याला गवसला ह्याचा तिला आनंद होतो.

त्याच्या समोर येऊन ती उभी राहते. मग इतका वेळ घोळत असलेले असंख्य विचार तेथल्या तेथें गोठतात.

तिला बोलायचं असतं. पण ती अडखळते व मग डोळ्याला डोळा भिडविण्याआधींच लाजेनें मान खालीं घालते. काय बोलायचं हेंच मग तिला कळत नाहीं. तरी पण ती तशीच उभी राहते.

आपल्या अंतःकरणांतील खळबळ त्याला जाणवली असणार अशीच मग ती कल्पना करून घेते. त्याचीहि स्तब्धता कांहीं काळ तिला बेचैन करते. कांहींतरी सुरुवात करण्यासाठीं तिच्या ओठावर शब्द येऊन लुडबुडतात...तसेंच विरतात व मग तिची नजर त्याच्या चेहऱ्यावर येऊन ठेपते, व केसांच्या झुलपांकडे पाहात स्थिर होतें.

त्याच्या भरदार केसांतून धांवत असलेले कांहीं रुपेरी केस ती पाहते.

पाहते अन् एक अस्पष्ट किंकाळी तिच्या तोंडांतून बाहेर पडते. त्याच क्षणीं तिला त्याची शिसारी येते. पूर्वीचीच ! व ती मनांतल्या मनांत चिडते. पुटपुटते-'म्हातारा'—फुली !





## बंगला

...पान ९ वरून

एव्हांना या बंगल्यांत येऊन त्याला वर्ष झालं होतं. वार्षिक परीक्षा हाताच्योटावर आली होती. कदाचित् सुटींत त्याला गांवाला परत जायला मिळणार होतं. त्याचा नंबर दुसरा होता. पहिला येण्याचा संभव होता.

चुलत्यांच्या खोलींत त्यानं भीतभीतच पाऊल टाकलं. चुलते आराम घेत आरामखुर्चीवर पडले होते. तोंडांत चिरूट होता. धुराचे जाड फवारे हवेंत विरत होते. धाकटी धिराला होती म्हणून किती उत्रदार अन् बरं बरं वाटत होतं त्याला.

'आणलंस ग त्याला?...'

'होय बाबा...हा पहा...इथं...'

'बस रे...'

त्याला कांहींच सुचत नव्हतं. धड उभं रहावं कीं बसावं हें सुद्धां समजत नव्हतं. धाकटीनं त्याला हाताला धरून खालीं खुर्चीवर बसतं केलं.

'परवां पटवर्धन गुरुजी भेटले होते मला...'

'हुं...'

'तुझी फार तारीफ करीत होते...'

'हुं...हुं...'

चुलती तर ऐकत नव्हती ना? म्हणून त्यानं मान वळवून इकडें तिकडें पाहिलं...

'असाच शिक...'

'हो...'

'बरं आहे. जा.'

परीक्षा झाली. त्याचा पहिला नंबर आला. त्याला गांवीं पाठविण्याचं ठरलं. चुलतीनं चक्क सांगितलं. पुनः इकडं यायचं नाहीं. तिची मुलं त्याच्या गांवढळ संगतीनं बिघडत होतीं. धाकटी तर अर्धीअधिक बिघडली होती. चुलत्यांनीं कांहीं दुजोरा दिला नव्हता. पण निमुटपणें 'हुं' म्हटलं होतं. वाट खर्चाला लागतील एवढेंच पैसे जेमतेम त्याला देण्यात आले होते. धाकटीनं मात्र त्याला एकट्याला एकांतांत गाठून स्वतःजवळचे दोन रुपये दिले होते. आग्रह करून त्यानें ते अमृतांजनाच्या डबींत सुरक्षित ठेवून ती डबी आपल्या पत्र्याच्या बॅगेंत अगदीं खाली कपड्यांत गुंडाळून ठेवली होती.

कोंकणांत परत आल्यावर सुद्धां त्याला त्या दोन रुपयांची किती अपूर्वाई वाटली होती! कित्येक महिने त्यानें ते जपून ठेवले होते. अनियमितपणें पण मध्येंच केव्हांतरी त्याला कोंकणांत मनिऑर्डर करीत. खाली कूपनांत धाकटीच्या अक्षरांत मजकूर लिहिलेला असे. अभ्यास कर. चांगला वरच्या नंबराला पास हो.

'संस्थानांतील पेट्याच्या शाळेंत तो सन्मानानें मॅट्रिक पास झाला होता.

दुसरं महायुद्ध सुरू झालं होतं. भारतीय स्वातंत्र्यांची चळवळ उग्र स्वरूप धारण करीत होती. चुलत्यांचं म्हणणं होतं आपल्या व्यवसायांत त्यानं शिरावं, विपुल पैसे देणारा! सभोंवताली स्वातंत्र्यलढ्याचं रणकुंड पेटलं होतं. दिवसेंदिवस कोणत्या तरी अनामिक ध्येयवादानं तो भारला जात होता. त्याचं अखंड वाचन चालू होतं. सखोल विचारांची दृष्टि त्याला येत होती. त्यानें लेखन सुरू केलं. त्याच्या निबंधांचं थोरामोठ्यांकडून कौतुक झालं. कथा संपादकांना पसंत पडल्या. वाचकांना आवडल्या. मुंबईत सकाळच्या कॉलजांत त्यानं नांव घातलं. दुपारी त्यानें एका शाळेंत शिक्षकाचा पेशा स्वीकारला. हलुहळू 'फ्री लॅन्स' म्हणून तो इंग्रजी-मराठी वृत्तव्यवसायांत शिरला. त्यानें घेतलेल्या कांहीं नामवंतांच्या मुलाखती गाजल्या होत्या. एकदां तो तुरुंगातही जाऊन आला. त्याचं इंग्रजी लेखन त्याच्या चुलत्यांना पण आवडलं होतं. धाकटीचं एके दिवशीं त्याला पत्र आलं. गडकऱ्यांसारखा तू सुद्धां persona grata हो म्हणून.

### वात्रटिका

आहेस तूं
निर्भेळ तूप
हवे खूप
(कांहीं केल्या मिळेना–)
आहे मी—
खजूर छाप
वनस्पती तूप
(मला कुणी पुसेना.)
नियतीच्या दुकानीं
भेसळ करुनी
होऊं दोघे एकरूप
पतीपत्नी स्वरूप.

—जयवंत गुजर

त्या बंगल्यांत त्यानं पहिलं पाऊल टाकलं तेव्हां तो एक शाळकरी बावळट कोंकणी मुलगा होता. युद्ध संपलं होतं. कॉंग्रेस मंत्रिमंडळं राज्यकारभार हाकूं लागलीं होतीं. स्वराज्य आलं होतं. एका परिषदेसाठीं तो पुनः त्या शहरांत आला होता. पुनःएकदां त्याचं त्या बंगल्यांत पाऊल पडलं होतं. एका मंत्र्याच्या बंगल्यावर त्याचं वास्तव्य होतं. त्या मंत्र्याचा भाऊ त्याचा बालमित्र होता. त्यानं स्वतःच्या मोटारींतून त्याला त्या बंगल्यावर आणलं होतं. आतां तो शाळकरी पोरगा नव्हता. आसऱ्याला आलेला नव्हता. पेपरांत त्याचं नांव छापून येत होतं. थोडेफार पैसेही त्याच्या खिशांत खुळखुळत होते.

चुलतीनं त्याचं स्वागत अगदीं मनापासून केलं होतं. चुलते व्यवसायांतून निवृत्त झाले होते. वय झालं होतं. मुलासांनतेतही लहानपणीच्या हाल-अपेष्टांची निशाणी त्यांच्या व्यक्तिमत्वावर उमटलेली दिसत होती. मुलींच्या बाबतींत ते अश्रद्ध बनले होते. कुणीहि त्यांच्या मनासारखं वागत नव्हता. 'गरीब बापाची श्रीमंत मुलं' असं ते आपल्या मुलांचं वर्णन करीत. उधळपट्टी होत होती. चुलते घरात एकाकी पडले होते. घरांत आतांपासूनच इस्टेटीच्या वांटणीबद्दल तंटेबखेडे सुरू झाले होते. चिन्हें ठीक दिसत नव्हतीं मोटार कुणी घ्यायची...रेडिओ कुणाचा...बंगल्यावर हक्क कुणाचा...चुलतीच या चाळ्यांना उत्तेजन द्यायची. तिची स्वतःची पुंजी बरीच मोठी होती. जो तो तिची खुशामत करीत होता. तिची सेवा अहमहमिकेनें करीत होता. चुलत्यांनीं गपचूप मृत्यूपत्र करून ठेवल्याची आंवई उठली होती. कित्येक हजार म्हणे त्यांनीं आपल्या धाकट्या भावासाठीं, गांवच्या घरासाठीं ठेवले होते. बंगला विकून टाकला होता. अन् स्वतः कांहीं काळ ते कोंकणांत येऊन रहाणार होते.

त्या रात्रीं कधीं नव्हे इतके ते आपल्या पुतण्याशीं बोलत होते. त्यांचं मन पुनः पुनः भूतकाळांत जात होतं. त्यांचे बालपणीचे, कष्टाचे, हालाचे दिवस त्यांना आठवत होते. त्यांना आपल्या आईची मूर्ति समोर दिसत होती. तिच्या मृत्यूच्या क्षणाला सुद्धां ते तिच्याजवळ जाऊं शकले नव्हते. तिनें जन्मभर कष्ट करून त्यांचे पांग फेडले होते. पण तिचा हा मुलगा आईचें ऋण फेडूं शकला

अनुक्रमणिका






नगता. त्यांना पुनः त्या गांवच्या मातींत जाऊन लोळावसं वाटत होतं. गाडगी-मडक्यांत शिजवलेली उकडीच्या तांदळांची पेज करटीच्या डावलींतून भुरकून प्यायची होती. त्यांचा अडाणी बालमित्र पण गांवच्या देवळाचा वाजंत्री शंकर सनईवाला याच्याबरोबर माशे पागायला जायचं होतं. त्या कोल्डोंगरावरून भटकून यायचं होतं, जिथून त्यांनीं लहानपणीं लंगोटी लावून डोक्यावर उचलून लाकडांचे भारे आणले होते. धाकटीवर त्यांचा सर्वांत जास्त जीव होता. पण तिनं त्यांना निराश केलं होतं. त्यांच्या मनाविरुद्ध एका कलंदर कलावंताबरोबर ती पळून गेली होती व लग्न केलं होतं. मात्र आतां ते तिला क्षमा करायला तयार होते. अधून मधून ते तिच्या नवऱ्याबद्दलच विचारायचे.

'तूं वाचली आहेस कां रे त्याचीं पुस्तकं ?'

'हो...फार मोठा लेखक आहे तो...'

'खरंच कां ?

'भाषाप्रभू आहे तो...'

'अस्सं !'

'वाचकांच्या उड्या पडतात त्याच्या कथा-कादंबऱ्यांवर...'

'हो का ?...'

'तूं भेटतोस कां त्याला कधीं ?...'

'अजून नाहीं...'

'धाकटीला भेटशील ?...'

'हो...'

'मी बोलावलंय म्हणावं त्या दोघांना...'

'जरूर...'

मग ते भविष्यकाळाचा विचार करायचे. जीवनाबद्दल विलक्षण उदास व निराश विचार त्यांच्या मुखावाटे कडवटपणें प्रकट होत होते. म्हणजे त्याच्या चुलत्यांचे हाल अजून संपुष्टांत आले नव्हते तर. आजी मागे म्हणाली होती तें खरं ठरलं होतं. हाल हाल काढीत होता तिचा मुलगा. जन्मल्यापासून...कदाचित् मरेपर्यंत.

तोच तो हा बंगला. त्या चौकाच्या कोपऱ्यावर तो तसाच उभा होता. झपाट्यानें मागे मागे गेलेलं त्याचं गतिमान मन एकदम स्थिर झालं. आतां तो स्वतः चाळीशीच्या उंबरठ्यावर उभा होता. आतां त्या बंगल्यांत अभिमानानं मान उंच करून तो पाहिल असं कुणीच रहात नव्हतं. तो बंगला आतां त्याच्या चुलत्यांचा नव्हता. एका मारवाड्याची मालकी त्यावर प्रस्थापित झाली होती. तिथं कुठल्या तरी खासगी विद्यापीठाचे वर्ग भरत होते. त्याला ओळखणारं तिथं कुणींच नव्हतं. नाहींतर सरसर जिने चढून तो वर गेला असता. पुनः एकदां त्याच नगरींत त्याचं व्यवसायांनिमित्तानें पाऊल पडलं होतं. मनानं तो त्या बंगल्यांत बराच वेळ मघापासून वावरला होता. अजूनही त्याच्या चुलत्यांची ती देखणी, रुबाबदार, भव्य देहयष्टि दूर सारूनही दूर होत नव्हती.

तो असाच फिरतीवर असतांना कुठें तरी त्याच्या हातांत वर्तमानपत्र आलं होतं. पानं चाळतां चाळतां त्याची नजर एका प्रतिमेवर स्थिरावली होतो. ती छबी त्याच्या चुलत्यांची होती. दूर उत्तर हिंदुस्थानांतील एका शहरांत ते एका मित्राकडे रहायला गेले होते. तिथं रात्रीं झोपेंतच हृदयक्रिया बंद पडून त्यांचं प्राणोत्क्रमण झालं होतं. क्षणभर त्याच्या डोळ्यासमोर दाट अंधार पसरल्यासारखं त्याला वाटलं होतं. नंतर डोळे पाणावले होते. गळ्यांत गहिवर दाटून आला होता. आपल्या चुलत्यांचं त्यानें मनोमन स्मरण करून त्यांच्या स्मृतीला अभिवादन केलं होतं. कुठें अज्ञात स्थळीं अपरिचित परक्या माणसांकडून त्यांचं और्ध्वदेहिक उरकण्यांत आलं असेल कुणाला ठाऊक ! त्याच क्षणाला त्याला त्याचं जुनं घर-खेड्यांतलं...कोंकणांतलं...आवर्जून आठवलं होतं. तिथं त्या अंधाऱ्या खोलींत त्यांचा जन्म झाला होता. पहिला टाहो त्यांनीं तिथं फोडला होता. मृत्यूसमयीं त्यांना त्या घराचं निश्चितच स्मरण झालं असेल. त्यांचं गांवीं जाण्याचं स्वप्न अपुरंच राहिलं असेल. कोंकणांतल्या मातीतला त्यांचा पिंड अ-कोंकणांतल्या कुठल्या परक्या निर्जीव मातींत मिसळून गेला असेल... काय काय झालं असेल—! काय काय वाटलं असेल त्यांना ! त्यांच्या आत्म्याला !—unwept... unsung...

मरणापूर्वींच त्यांनीं बंगला विकून टाकला होता. चुलतीला कधीं या मुलाकडे, कधीं त्या मुलाकडे दिवस काढावे लागले होते. लाचारीनें एकदां एकटीच ती अपमानित अशी त्या नगरींत परतली होती. कुणा जुन्या ओळखींच्या माणसांकडे येऊन राहिली...आजारी पडलीं आणि सरकारी इस्पितळांत खंगून अन् खोकत भाडोत्री दायाद्यांच्या देखरेखीखालीं मरण पावली...

कित्येक दिवस कुणाला कांहींच कळलं नव्हतं.

त्या बंगल्यासमोरच्या पटांगणांत एका बाकड्यावर तो केव्हां येऊन बसला होता त्याचं त्यालाच ठाऊक नव्हतं. त्या बंगल्यांत सामसूम झाली होती. दिवे मालवले होते. रात्र वैरीण झाली होती. चौकांतें लोकांची येजा मंदावली होती. त्याचीं पावलं जड झालीं होतीं. कुठून कसं बाहेर पडावं हेंच त्याला कांहीं काळ कळेना...

## भीष्माचा डोंगर

...पान १७ वरून

विंग्रजी शिकवायचं तर सगळ्यांना बरोबर. त्या दोघांचीं पोरं सोन्याचीं आणि माझी काय शेणाचीं आहेत रे म्हणून हा भेद केलास ?' मथीकाकूनं दमांत विचारलं.

'छाः! असं कधीं झालं आहे ? सगळी तुम्ही सारखीं! एकाच घरचीं का नाहीं ?' तिची समजूत काढीत अण्णागुरुजी म्हणाला.

'अकरा दिसांचे वारशी आम्ही.' काकूनं आवाज चढवला. 'हें तुला ठाऊक. ठाऊक नाहीं त्या कमळीच्या पोराला. तर साग हें त्याला आणीक हें देखील सांग कीं शिकवायची खाजच असली तर सगळ्यांना सारखं शिक्षण झालं पाहिजे. त्या दोघांच्या पोरांना जास्त आणि माझ्या मुलांना कमी असं खोटं काम या मथीकाकूला खपणार नाहीं. उद्यांपासून धाडून देते पोरांना.'

मथीकाकू आली तशीच गेली.

आणि मागं विजय मामाच्या अंगावर खवळून उसळला, 'गेले उडत! मी नाहीं यांना शिकवणार.'

'अरे होय! सबूर! जरा दमानं घे बेटा!' अण्णा त्याला चुचकारूं लागला.

'मला हवं त्याला मी शिकवीन! ही कोण हुकूम करणार ?' हें आणि असंच कांहींतरी विजय बडबडत राहिला.

त्याच्या मामानं त्याला अडवलं नाहीं. बोलूं दिलं. आपण गप्पच बसला. निमूट भाच्याची ती बडबड ऐकत राहिला.

आणि कांहीं वेळानं तो थंड झाला तसं खोल आवाजांत अण्णागुरुजीनं सांगितलं, 'बेटा, यातही धोरण आहे. अण्णाज हायस्कूल. प्रिन्सिपॉल माय भाचा. व्हाट यू से ?'

कपाळ! विजय खोः खोः हंसत सुटला. नाहींतरी शहाणा माणूस बोलणार तरी काय ?

गांवानं हें भाकीत आधींच केलं होतं. अण्णानं कमळीच्या पोराची बाकी चोख व्यवस्था केली. मुंबईला बेकार भटकत होता. तर गावीं बोलावून घेतलं. आपल्या हाताखालीं ठेवून दिला. बरं झालं! पोर निदान मार्गाला लागला.—गांवांत लोकं बोलूं लागलीं...

पुढं चार दिवसांनीं तार आली. विजयची असिस्टन्ट मॅनेजर म्हणून कंपनींत नेमणूक झाली होती. खुद्द मालकाची, पुरुषोत्तमदास मेहताची तार! ती विजयच्या हातात पडण्यापूर्वीच ही गोष्ट गांवात सगळ्याना ठाऊक झाली होती. आणि मग पुन्हा 'विजय-पर्व' पुढं चालूं झालं. कमळीच्या पोराचं नांव नांवाजूं लागलं. शिळी कढी, ताजी फोडणी—आंबट तोंडाना ऊत आला. झालं, होत आहे रे, एक वशिला मात्र पाहिजे या सूत्रावर व्यावहारिक भाष्य होऊं लागलं. तुका म्हणे येथें पाहिजे भाविणीचें, भटाबामणांचं काम नोहे, अशी जाहिरात होऊं लागली.

म्हातारा अण्णागुरुजी मात्र जाम जोरांत होता. नाहींतरी उभं आयुष्य पोफळीच्या झाडासारखा तो नुसताच लटपटत आला होता. ताठ उभं रहायला बूडच नव्हतं. तें मिळालं होतं. पारंबीच! पण, झोके घेणाऱ्याला तेंच परब्रह्म!

डोळ्यांत पाणी आणून, तें सुद्धां हुकमीच होतं, अण्णागुरुजी भाच्याला म्हणाला, 'मोठा झाला रे बेटा! समाधान वाटलं, पावन झालों !'

'मामा, हें काय आणखी ?'

'पण मी म्हणतों भांचोद् मामाला हें सांगायला काय अडचण होती रे ?' डोळे पुसीत म्हातारा म्हणाला.

विजयनं हंसून म्हटलं, 'नक्की कुठं काय होतं.' फक्त इंटरव्यू झाला होता.

'अरे तेंच-तेंच सांगायचं. सावध राहिलों असतों. असं टाळकं नसतं फिरवून घेतलं. तें फिरलं आणि दाढीवर हात टाकला रे पोरा!' अण्णानं गंहिवरून सांगितलं.

या बोलण्यानं विजय देखील पाघळला. जड आवाजांत म्हणाला,

'झक मारली नोकरी! नकोच ती. त्याहून तुमची शाळा बरी. तीच चांगली चालवावी, नांवारूपास आणावी, हायस्कूल काढावं...'

आ!

अण्णाचं तोंड साफ उघडं पडलं. तो भाच्याकडे बघतच राहिला. रागानं कांहीं बोलणार पण राग जिरला होता, शब्द तोंडून निघेनात. नकारार्थी मान हलवित म्हातारा पुटपुटत होता, 'छाः! छाः! खुळाच खुळा!'

'खरंच मामा.'

'विजय, अरे तुला शहाणा समजत होतों मी.'

'मामा—'

'बेटा, माणसाला नांव, गांव, लौकिक असल्याखेरीज कांहीं खरं नाहीं. फुकट जन्माची परवड! मी एक करून घेतली. तुला मात्र करूं देणार नाहीं. नाहीं-हजारदां नाहीं! तें वेड आहे. टाक तें अजा-बात-विचार करूं नकोस!' अण्णागुरुजी अनुभवाचा ल. सा. वि. शिकवूं लागला. 'विचार कर एक नोकरीचा मोठा हो. स्वतःचं, आणि जातीचं नांव वाढव. आधीं हें कर आणि मग-मग मिठाच्या बावडांत बुडून मेलास तरी चालेल!...'

### ७

खिशांत ती तार टाकून विजय गांव भटकत होता. कंपनीच्या खाणीचा तपास करीत डोंगरें-रानें तुडवीत होता. कुठच्या खाणी न् काय ? कंपनीचाच पत्ता नव्हता. निदान गांवात तरी कोणाला माहिती नव्हती. कदाचित् ठाऊक असूनही मुद्दामच लोकं बोलत नव्हतीं. कोणाला काहीं विचारलं तर शहाणपणाचा मोठा आव आणून तो म्हणे, 'अरे, मॅनेजर ना तूं कंपनीचा ? तर आतां हे सुद्धा आम्हाला विचार. उद्यां लग्न झालं कीं विचारायला येशील माझी बायको कोण ? काय, तेव्हा तूंच साग-'

त्याला क्षणक्षणीत जाब द्यावा असं विजयला खूप वाटे पण त्यात अर्थ नव्हता. हवी ती माहिती त्याला मिळाली नसतीच. उलट नको ते चार शब्द ऐकून घ्यावे लागले असते.

तिसऱ्या का चौथ्या दिवशीं गावांतील एकुलत्या एका पोस्टांत पत्र तरी आहे का, म्हणून, चौकशी करायला तो गेला होता. पत्र नव्हतंच—





हिरमुसला होऊन तो परत फिरला.

घाटी चढून माथ्यावर येतो, तर तिथं जंगी मारामारी चालू होती.

बाळ्या नाबर हातांत पहार घेऊन दमछाट डरकाळ्या फोडत होता. त्याचीं पाचीं पोरं, बाळ्या कौतुकानं त्यांना माझे 'पांच पांडव' म्हणायचा, फक्त तीर्थरूपांच्या आज्ञेची वाट बघत होते. थोरले दोघे दंड व मांड्या थोपटून अंगांतील मस्तीचं प्रदर्शन करीत होते. शेष त्रिकुट शिरा‍ंगाळ करीत जमिनीवर दगडं न् ढेपळं फोडीत होतं.

बिचारा गुणाजी नाडकर्णी मात्र घामानं थबथबला होता. लटपटल्या पायानं तो कसाबसा उभा होता. धोतराच्या सोग्यानं तोंड पुशीत, मोठमोठ्यानं नाक शिंकरीत.

'अरे पावणे आठ तूं!' बाळ्या नाबर गुणाजीला समज देत होता. 'आधीं माझ्यासारखीं पांच पोरं तयार कर आणि तेव्हांच बाळ्या नाबरासमोर तंट्याला उभा रहा.'

'तंटा काढलास तूं.' गुणाजी फुरश्यासारखा फुसफुसला.

'मी? मायच्या, माझा गडगा टाकलास कोसळून. बघ तुझ्याच डोळ्यानं. तीन दिवसांत उभा केला मी. शेंपन्नास रुपये खर्च केले भडव्या, तुला नाहीं बघवलं.

'रवळनाथाच्या पायावर हात ठेवून सांगतों तुझ्या गडग्याला मी हात सुद्धां लावला नाहीं.' गुणाजीनं शपथेवर सांगितलं.

'हात नाहीं, पाय लावला असशील.' बाळ्या नाबर म्हणाला आणि स्वतःवरचं खुष होऊन मोठ्यानं हंसला. 'गुणाजी, तुझ्या शब्दावर बायकोचा—म्हणजे तुझ्याच—तरी विश्वास आहे काय रे? तर तो मी ठेवीन.'

'चारचौघांत शोभा केलीस, त्यापेक्षां पोलिसांत केस द्यायची होतीस.' नाडकर्ण्यानं फणफणत सूचना केली.

'तितका नामर्द नाहीं मी! जा, एकदां समज देऊन सोडून देतो!'

'नाहीं जाणार? माझ्या हद्दींत उभा आहे मी.' गुणाजीनं कायद्याची भाषा काढली.

'नाहीं जाणार?'—आणि बाळ्यानं आपल्या पांच पांडवांना आज्ञा केली, 'अरे बघतां काय? धरा याला! घरापर्यंत पोंचवून या'

तशीं तीं पांची आज्ञाधारक पोरं एकदमच गुणाजीच्या अंगावर तुटून पडलीं. एकानं मान, दुसऱ्यानं हात—कोणी काय न कोणी काय! पराक्रम दाखविण्याची आयती संधि! बाळ्या नाबराच्यां पोरांनीं तिचा फायदा घेतला नसता तरच आश्चर्य!

तशी बरीच गर्दी होती. त्यांनाही तें बघवेना. लोकांना बरं वाटलं नाहीं. तीं हळहळलीं, कळवळलीं. गुणाजी नाडकर्णी म्हणजे कांहीं अगदींच किरकोळ नव्हता. एक वजनदार, प्रतिष्ठित माणूस तो. त्याच्या टाळक्याचीहि तशी गांवात खूप तारीफ होती. आणि—अशा या बड्या माणसाची आपल्या आचरट पोरांकडून बाळ्या नाबरानं गावातून धिंड काढली होती. म्हणजे गर्दीलासुद्धां तें पसंत नव्हतं.

पण बोलणार कोण? बामणांच्या या तंट्यात मध्ये पडायचं कोणी? इतरांनीं नुसता शब्द काढला तरी तो गुन्हा होता. डोक्यावर कातडं ओढून आणि तोंडाला टाळं लावून लोकं चिप्प होतीं.

खाटकाच्या हातांत पडलेल्या बकऱ्यासारखा असहाय्य नजरेनं गुणाजी एकेकाकडे बघत होता. त्या बघण्यांत याचना होती, विनंति होती, माणसाला आवाहन होतं.—

होय! विजयला रहावलं नाहीं. बघून मुडद्यासारखं गप बसवेना. तो पुढं झाला. बाळ्या नाबराच्या पोरांना त्यानं सात्विक संतापानं विचारलं, 'मोठ्या माणसाच्या अंगावर हात टाकायला कांहींच कसं वाटत नाहीं तुम्हाला? सोडा त्यांना!'

त्याच्याकडे इंग्रजी शिकायला येणारीं तीन पोरं 'सर सर' करीत अवघडलीं. थोरल्या भावांकडे बघूं लागलीं.

तसा थोरल्या दोघांपैकीं एकानं जाब केला, 'नाहीं वाटत. तुला कांहीं वाटत असेल तर ये, सोडवायला.'

आणि दुसरा हंसला. उद्धटपणं, त्याला खिजविण्याकरतां.

विजयच्या पायाची तिडीक मस्तकांत गेली. आणि खवळून वाटेंत तो आडवा आला. पण गर्दीतून मुसंडी मारीत खुशाली धांवला. विजयला त्यानं मिठीच मारली. आवरलं. घाबऱ्याघुबऱ्या स्वरांत म्हटलं, 'गुरुजी चला, आधीं चला बघूं! नाहींतर वाट लागली!'

'तुझा गुरुजी डरपोक नाहीं खुशाली.'

'छः छः!' खुशालीनं त्याला बोलूंच दिलं नाहीं. विजयचा हात धरला आणि तो चालूं लागला. शाळेंतील आणखीं चार-दोन पोरं विजयाच्या अंगाला झोंबलीं. बळेंच त्याला तीं ओढत नेऊं लागलीं.

विजयचा निरुपाय होता.

वाईट म्हणजे बाळ्या नाबराचे पांच पांडव मागं त्याची हूर्यो करीत होते...

विजय सारखा तोच विचार करीत होता. बरं नव्हतं झालं. अगदींच बावळटपणा झाला होता. नको तें तोंड घातलं आणि मग आयत्यावेळला असं शेपूट! ही गोष्ट त्याला खात होती. गांवांत लोकं म्हणत असतील—दुसरं काय? आपली किंमत केली असेल त्यांनीं!

धरणावरच्या गार पाण्यानं सुद्धां त्याचा मनस्ताप कमी झाला नाहीं.

उन्हाच्या तुरळक कवडशांत चमकणारं तें आरस्पानी पाणी, अंगावर काटा उभा करणारा पाण्याचा तो थंड पहिला स्पर्श, भोंवताली पसरलेलं माडापोफळीचं गर्द कुळागर, वर झावळांतून सळसळ खेळणारा वारा, बाजूला खळखळ वहाणारे पाट—तहानभूक हरपावी असं फुललेलं अन् फुलविणारं तें धुंदं न् कुंद वातावरण!

—पण नाहीं! विजय आज स्वतःला विसरूं शकला नाहीं. त्याच्या अंतःकरणांतील आकान्त थांबेना. काळजांतील कावळ्यांचा कोलाहल चालूच होता. तो शांत होईना. पाण्याच्या पृष्ठभागावर कितीतरी वेळ तो तसाच निश्चेष्ट, निश्चल पडून होता. वर, निळ्या आभाळाच्या चिंध्या पिंजणाऱ्या माडांच्या झावळांकडे बघत.—

आणि जरा उशीराच असेल! विजयचं लक्ष गेलं.

बांधावर उभी राहून सावित्री केव्हाधरनं त्याला हटकत होती, 'अरे ए गुरुजी—'

'मला—मला म्हटलंत कांहीं आपण?' भानावर येऊन त्यानं विचारलं.

पदर खोंचून दोन्ही हात कमरेवर घेत ठसक्यांत ती उभी राहिली. खळखळत म्हणाली, 'ए आपणवाल्या, माझं नांव सावित्री. मला सांग. या खातांत ही धुणीं कशीं धुवूं रे?'

'खातांत?' त्याला कांहीं कळलंच नाहीं.

'होय! तळचा चिखल वर उपसुन सोम्यासारख्या पाण्याचं जें हें काय कर्म केलंस त्याला खात म्हणतों आम्ही.' तिनं स्पष्टीकरण केलं.

अनुक्रमणिका






आणि हा उलगडा झाला तसं विजयला हंसू कोसळलं. तो आपला खोः खोः हंसत सुटला. हंसतच म्हणाला, 'सॉरी हं! खात—खात!'

सावित्रीला चेष्टा वाटली. आणि तिला ती खपली नाहीं. ती भडकली. तणतणत ओरडली, 'मेल्या हंसतोस मला? चेष्टा करतोस? येउं दे ह्यांना! सांगते काय तें!'

'ह्यांना?' विजय पुन्हां गोंधळला.

'हिणवूं नकोस! कळतं मला.' सावित्री आणखीच उसळली. हूंः! ह्यांना म्हणजे बंडोपंतांना. मला नाहीं लाज.'

'बाई लाज वाटण्यासारखं त्यांत कांहीं नाहीं.' विजयनं सहज म्हटलं.

'काय?'

सावित्री गर्रकन् फिरली. टवकारून त्याच्याकडे बघत राहिली. शकूचा हा गुरुजी बिलकुल चावट आहे असं तिचं मत झालं. सरळ तोंडावर सांगतो मेला कीं लाजण्यासारखं कांहीं नाहीं. आणि तें सुद्धां तिला—सावित्रीला! नुसता चावटच नाहीं—तर लोचट. लुच्चा!

ती गप्प झालेली बघून विजय मिस्कीलपणानं म्हणाला, 'नवऱ्याचं नांव घ्यायला लोकांची कां हरकत असावी?'

नवरा? याला काय वेड लागलं आहे? हा बंड्या नाबर तिचा नवरा? तो बामण–ही भंडारी? कमळीच्या या पोरानं कमाल केली होती. धोरण नाहीं, निदान अक्कल तरी? तीसुद्धां दिसत नव्हती. खूप शिकलाय म्हणे! हें याचं शिक्षण! तोंडाला येईल तें बोलायचं—

सावित्रीनं उसळून म्हटलं, 'आग लागली तुझ्या तोंडाला! नवऱ्याचं नांव घेईन होय रे मी? लाज सोडली पण रीत नाहीं सोडली सावित्रीनं, हां!'

'म्हणजे–म्हणजे?' विजय अडखळला. भोंवऱ्यांत पडला.

आणि अशांत खुद्द बंड्या नाबरच सावित्रीचा माग घेत तिथं धरणावर हजर झाला. त्याला वाटलं ती एकटीच आहे. खालीं पाण्यांत उभा असलेला विजय त्याला दिसला नाहीं. दिसणं शक्य नव्हतं. मागच्या मागं सावित्रीच्या पदराला बंड्यानं हात घातला, अलगद तिला जवळ खेंचली. कमरेला विळखा घातला. अचकट हंसत तो कांहीं विचकट बोलला—

सावित्री भिरभिरत हंसली.

'मेल्या एकली नाहीं मी.' स्वतःला सोडवून घेत ओरडली. चट् बाजूला झाली. विजयकडे बोट दाखवून सावित्रीनं म्हटलं, 'ते आहे एक खुळं! ए गुरुजी, आतां आटप तुझं!'

आणि तसं बंड्यानं विजयला छेडलं, धरणावर काय काम रे तुझं? भांचोद, कटकट!'

'रोज हिंथं येतो, पाण्याचा हा असा खात काढतो. विचारलं तर वर मलाच हंसतो, चेष्टा करतो रे–माझी.'

'दोन गुस्कटांत बसल्या कीं येईल सरळ.' बंड्याचा हुकुमी उपाय.

'जाऊं दे! नवीन आहे गांवांत.'

'पण तुझी मस्करी करतो म्हणजे काय?' बंड्याचा मुख्य आक्षेप.

'तूं नाहीं करत?'

'माझी गोष्ट वेगळी. हक्कच आहे माझा.'

'हक्क?' आणि ती मान मोडून हंसली. बावळासारखं अंग लबलबत पुढं झाली. अंगलगी करीत म्हणाली,' कोणी दिला रे बंड्या?'









देणारी तूं, घेणारा मी.'

'काय–काय रे ?'

जाब शब्दानं नाहीं, प्रतक्ष कृतीनं मिळाला. बंडया नाबरानं तिला ओढली. घट्ट छातीशीं कवटाळली आणि तिला उचलून तो बाजूच्या झुडुपांत शिरला.

कांहीं वेळ असाच गेला. आणि मग धर्म्या रुद्रे बायकोचा तपास करीत आला. आला बारीक नजरेनं इकडे तिकडे बघत. पुढ्यांत टॉवेलनं अंग पुशीत विजय उभा होता. पण धर्म्याला तो दिसला नाहीं. किंवा पाहूनही त्यानं न पाहिल्यासारखं केलं असेल! बाजूला पडलेली सावित्रीची धुणी त्याला दिसली. ती उचलून तो तिथंच बसला. धुणीं चोळूं लागला. हाश् हाश् करीत बाजूच्या दगडावर आपटूं लागला. तोंड चाललंच होतं, 'धुणीं हिथं–ही गेली कुठं? भटक म्हणावं गांव. तें एक केलं म्हणजे झालं. कामं राहिलीं तरी चालतात. आहे हक्काचा नवरा, करतोच आहे...आं! आणि सावू चोळील फक्त स्वतःच्या कपड्यांना. पोरीचं परकल–पोलकं, तें विटलं तरी चालतं. अशी ही रांड मसणांत गेली वाटतं! आणि जाईना–'

धर्म्या भेटला कीं त्याच्याशीं चार शब्द बोलल्याखेरीज विजय सहसा पुढं जात नसे. पण आज मात्र धर्म्याला त्यानं टाळलं. त्याच्याशीं बोलणं त्याला नको वाटलं. त्याला तिटकारा आला होता. चीड आली होती. हा नालायक आहे. वळवळण्यांत आणि तळमळण्यांतच याला सुख, समाधान. त्याच्याबद्दल दया, करुणा वाटायचं कारण नाहीं. तसं वाटणं म्हणजे आपलाच कमकुवतपणा आहे, असं विजयला वाटलं.

ती पोर शकू शाळेंत नसती तर धरणावरचा तो प्रसंग विजय विसरलाही असता.

म्हणजे त्याला त्यांत विशेष कांहीं नव्हतं. मुंबईला खेतवाडींतील गल्लीबोळांत आयुष्य घालविलेल्या माणसाला कांहीं खास वाटावं असा तो प्रसंग नव्हता. या असल्या सावित्र्या आणि हे असले धर्मे त्यानं खूप पाहिले होते. इकडे गांवाकडे निदान एक बरं असतं. एकान्ताला आडोसा भरपूर. शहरांत तेंही नाहीं. तिथं लाज इतरांना—ती असेल, तर डोळे मिटून घ्यावेत!

दुपारच्या शाळेला आज बरींच पोरं गैरहजर होतीं. पण शकू मात्र हजर होती.

वर्गांत आपल्या नेहमीच्या जागेवर ती बसली होती. शांत, चूपचाप. इतर मुलांसारखी फाजील वटवट नाही, नसती चुळबुळ नाहीं. दप्तर उघडून पाटी, पुस्तकं, पट्टी, सिगारेटच्या पाकिटांत ठेवलेल्या पेन्सिली, पाण्याची बाटली—असा सगळा थाट मांडून पोर त्यांतच मग्न होती. कोणाच्या अध्यांत नाहीं, मध्यांत नाहीं. आपली आपण! वयाच्या मानानं पोरटी भलतीच समंजस होती.

इतके दिवस विजय नुसतंच नंवल करायचा–आणि कौतुक! आणि आज त्याला वाईट वाटलं. रुखरुख लागून राहिली.

सावलींत वाढणारं रोप!

शकूकडे पाहिलं कीं दुसरा विचारच त्याच्या मनांत येत नव्हता.

घरीं तिच्याकडे कोणी लक्ष देत असेल का? बाकीच्या मुलांसारखं तिचं कौतुक होत असेल काय? तिला मायेनं कधीं कोणी जवळ घेत असेल का? हे अन् असलेच प्रश्न स्वतःला विचारीत तो खुर्चीवर बसला होता. आपल्या अनुभवावरून उत्तरं शोधण्याचा निरर्थक प्रयत्न करीत होता. प्रश्न वाढतच होते. आणि उत्तरं दशमानपद्धतीनं टिंबांत शिरत होतीं.

दुसऱ्या तासाला त्याच्या लक्षांत आलं कीं बरींच मुलं आज आलेलीं नाहींत. एक एक नांव विजय वाचत होता आणि पोरं सांगत होती, 'गैरहजर गुरुजी.'

असं पांचदहा वेळां झालं आणि तसा हजेरीपट्टच त्यानं मिटून बाजूला ठेवला आणि हंसत सांगितलं, 'चला, पळा घरला. आज तिसरा तास सुट्टी.'

पोरांना एकच आनंद झाला. भरभर त्यांनीं दप्तरं भरलीं. गळ्यांत अडकवलीं. बडबड, धक्काबुक्की करीत तीं उभीं राहिलीं. आणि प्रार्थना सुरू झाली—

गणपत गणपत श्रीफळ खंडन
मस्तक बरोबर चौदा दंडन ॥
घे आणीक विद्या दे
विद्या म्हणजे कल्याण ॥
मांणीक मोती मल्याण
मल्याणीचे निळे घोडे ॥
ते गेले चरांवयां,
विद्या आली पडावियां ॥
पडे पडे तो राज्य बुडे...

पोरांच्या आरडाओरडींपुढं कांहींच ऐकूं येत नव्हतं. म्हणूनच खुशालीचा आकान्त विजयाला ऐकूं गेला नाहीं.

खुशाली आणि शाळेंतील कांहीं पोरं सांबरपावलानं जीव घेऊन धांवत येत होतीं. बाळ्या नाबराचे महापराक्रमी पंच पांडव काठ्या घेऊन त्याच्यामागं लागले होते.

तीं पोरं ओटीवर पोंचलीं आणि विजयच्या पायावर कोसळलींच. हमसाहमशीं रडत ओरडत होतीं, 'गुरुजी मेलो, वाचवा! आमचा जीव घेतील हो!'

'कोण?' विजयनं विचारलं.

'हे...हे...' त्यांना कांहीं नीट सांगतां येईना. तीं भलतींच घाबरलीं होतीं. भयानं लोळागोळा झालीं होतीं.

'ए, हट् बाजूला!' बाळ्याचं थोरलं पोरगं ओरडलं.

'तूं?' त्याला बघून विजय पुटपुटला. पण त्याला कांहींच अर्थबोध होईना.

'मीच. सोड या पोरांना. हो बाजूला.' काठी उगारून तो त्याच्या अंगावर आला.

आणि विचार करायला विजय थांबला नाहीं. वेळ नव्हता; कारणही. ती उगारलेली काठी त्यानं वरच्यावर घट्ट पकडली. जोराचा हिसडा देऊन काढून घेतली. बाळ्या नाबराच्या पोराचा हात सुन्न झाला. तोंड उघडं पडलं. डोळे पांढरे झाले. तो आपला नवलच करीत राहिला.

'कोणाच्या परवानगीनं आंत आलात? व्हा चालते–गेट आउट!' विजयनं पंच पांडवांना जामलं.

'भाचोद! जायला सांगतो–आम्हांला! हूं! कोणाची हिंमत नाहीं गांवात. तुझ्या त्या येरंड्या मामाची सुद्धां हां!' बाळ्याचा ज्येष्ठ






चिरंजीव हात चोळीत म्हणाला, काय करणार? हातांतली कांठी गेली होती.

'बाहेर हो! गुंडांना इथं प्रवेश नाहीं.' विजय थंडपणं बोलला.

तशीं थोरल्यानं आपल्या भावांना आज्ञा केली, 'बघतां काय? हाणा भडव्याला, फोडा टाळकं.'

पण तितक्यांत तो स्वतः वर हवेंत उडाला. 'अरे, अरे' करीत गडगडत गेला. पडला बाहेर जाऊन रस्त्यावर. मातींत लोळला. धुळीनं माखला.

तिकडे बघत थंड, करड्या आवाजांत विजयनं त्याच्या भावांना विचारलं, 'सरळ जाणार का याच्या सारखें?'

पण कोणी नव्हताच. एकूण रागरंग पाहून ताड् ताड् उड्या टाकून बाळ्याचीं पोरं कधींच पसार झालीं होतीं.

दोन्ही हात तोंडावर मारून रस्त्यावर विजयच्या नांवानं त्यांनीं बोंब ठोकली. 'बाहेर तरी पड, हें करीन न् तें करीन' अशा वल्गना सुरू केल्या. हातांतील काठ्या दणादण जमिनीवर आपटीत ते दमदाटी करूं लागले.

हा असा दंगा सुरू झाला तशी गर्दी जमली.

तिकडें दुर्लक्ष करून विजयनं खुशालीला छेडलं, 'काय केलंत रे त्यांचं?'

'कांहीं नाहीं, गुरुजी!' चारपांच आवाज एकदम उठले. पोरांना आतां तोंडं फुटलीं. 'या खुशालीची पेन्सल बाळ्या नाबराच्या गडग्यांत पडलीं. आतां ती हुडकायची म्हणजे गडग्याचीं दगडं बाजूला करायला नकोत?'

'तो—तळपीवरचा. कंपनीची अडवणूक व्हावी म्हणून बाळ्या नाबरानं घातला आहे तो—तोच!'

'त्या गडग्याचे दगंड बाजूला केलेंत?' विजयनं दचकून विचारलं.

'करणार काय? पेन्सल हवी तर हें करायलाच हवं. खुशाली म्हणाला पेन्सल महत्वाची.' पोरांनीं आपली बाजू मांडली. त्यांच्या दृष्टीनं ती मजबूत होती.

'चार दिवस शोधतों आहोंत. पण नाहीं मिळत.' राज्यच बुडालं अशा हताश स्वरांत खुशाली म्हणाला, 'फुकट बाळा नाबराचा नवीन गडगा मात्र मातीला मिळाला.'

'मातीला मिळाला? अरे, आणि गुणाजी नाडकर्ण्यांची धिंड काढलीन् त्यानं.' विजय चांगलाच हादरला, गडबडला. 'अरे, अरे काय केलंत हें? गांव म्हणेल मीच शिकवलं.'

'अण्णागुरुजी, काळजी करूं नका. काय करायचं तें हा राजाभाऊ गोळे करील.' आधीं हें आश्वासन आणि मागून एक वयस्कर माणूस पायऱ्या चढत आला.

पिवळा लांब कोट, तलम धोतर, डोक्याला वाटोळी हंगेरियन टोपी, पायांतील पुणेरी जोडे दारांत काढून ठेवून चांदीच्या मुठीची काठी मिरवीत रुबाबांत तो पुढं झाला. हंसत म्हणाला, 'आम्ही राजाभाऊ गोळे. मॅनेजर, मेसर्स मेहता, करीमभाई ॲन्ड कंपनी–काय? हें आमचं कार्ड.'

कोटाच्या वरच्या खिशांतून व्हिजिटिंग कार्ड काढून त्यानं विजयला दिलं.

'या, या–बसा!' विजयनं त्याचं स्वागत केलं, समोरच्या खुर्चीकडे बोट दाखविलं.

'नको. खुर्चीवर बसायचं तुम्ही. शाळेंत खुर्चीचा मान गुरुजींचा' राजाभाऊ म्हणाला. म्हातारा चांगला गरगरीत होता. आणि आवाजसुद्धां तसाच मोठा होता.

'मी नाहीं गुरुजी. ते बाहेर गेलेत. मी त्यांचा भाचा–विजय शिर्के.'

'विजय शिर्के? माय असिस्टन्ट?' राजाभाऊनं ताडकन् खुर्चीवर आसन ठोकलं आणि तसा त्याचा स्वर बदलला. बोलणं बदललं 'मिस्टर शिर्के, व्हाट हॅव यू डन अबाउट इट? तयारी झालीच असेल.'

'कसली तयारी?' विजयनं गोंधळून विचारलं.

'इंग्रजींत बोला. आपल्या साहेबाबरोबर साहेबाच्या भाषेंत बोलायचं असतं. डिसिप्लीन रहातं. अहो, परवा पूर्णिमेला कंपनी सुरू होणार. डेप्युटी मिनिस्टर वसंतरावजी सावंत उद्घाटक. आणि यू से व्हाट ॲरेंजमेंटस्–कसली तयारी?'

'बट आय् नो नथिंग ऑफ धिस—' विजयनं सांगितलं, 'खरंच कांहींच माहीत नाहीं.'

पण राजाभाऊ उखडला नाहीं. उलट हंसत सुटला. म्हणाला, आय नो, आय नो! मला आहे ठाऊक! डोन्ट वरी–काळजी करूं नका. एव्हरीथिंग विल बी डन. सगळं होईल–काय? नाऊ दॅट् आय् ॲम् हिअर' त्याची एक संवय होती. प्रथम इंग्रजींत बोलायचं. मागून तेंच मराठींत सांगायचं.

आणि त्याच्याकडे सादर भीतीनं बघत उभ्या असलेल्या मुलांकडे लक्ष जातांच राजाभाऊ गोळे एकदम उठला. उत्साहानं वितळला. हातवारे करीत म्हणाला, 'या तुमच्या मुलांवर मात्र आपण बेहद्द खुष आहोंत. चलाख, हुषार आहेत मुलं.'

कांहीं मुलांना त्यांनीं जवळ बोलावून घेतलं. खिशांतून दहाची नोट काढली. ती मुलांना देत म्हटलं, 'चला, मजा करा! कंपनीच्या नांवानं पेढे–बर्फी खा.'

इतका वेळ एकीकडे कोपऱ्यांत तोंड चुकवून सावित्री उभी होती. निमूट बघत, ऐकत. कां कोण जाणे? तोंडावर पदर घेऊन लाजत ती पुढें झाली. खालीं न्याहाळत हळूंच म्हणाली, 'शेट, आणि मला काय देणार?'

'शिर्के, हू इज धिस लेडी?' राजाभाऊंचा उत्साह आतां तर शिगेला पोंचला.

'लाडी नाहीं. सावित्री मी शेट. ही युगत मीच शिकवली पोरांना. ह्या गुरुजीनं नाहीं. म्हणून म्हणतें बक्षीस हवंच मला.' सावित्रीनं नखऱ्यांत सांगितलं.

'देऊं—देऊं!' राजाभाऊ तिच्या बोलण्यांनं गार झाला. तिच्या नखऱ्यानं गारद झाला. खिशांत हात घालून सावित्रीकडे तो बघतच राहिला.

विजय शिर्के, असिस्टंट मॅनेजर, मेसर्स मेहता, करीमभाई ॲंड कंपनी शून्य नजरेनं बाहेर कुठंतरी बघत होता.



अनुक्रमणिका




दीपावलीकडे अभिप्रायार्थ पुस्तकें पाठवितांना नेहमीं २ प्रति पाठवाव्यात म्हणजे निश्चित अभिप्राय देणें सोईचें होतें. १ प्रत असल्यास नुसती पोंच दिली जाते.

—संपादक

● आताशी मगाशी ● बालकवि ● सांगावा

## स्वभावनिष्ठ हास्यरेखा

**श्री. शां. शं. रेगे यांचीं**

कांहीं विडंबन गीतें अजून स्मृतींत घर करून आहेत. 'काल परवा होतीस पोरसवदा तूं ' या कै. मर्ढेकरांच्या कवितेचें त्यांनीं केलेलें विडंबन 'काल परवा होतास पोरसवादा तूं ' वाचल्यावर मी तर त्यांतील मिस्किलपणा व व्याजोक्ति यांचा हलकाफुलका वापर पाहून शां. शं. रेगे यांना चांगलेंच ध्यानीं घेतलें होतें. खरं म्हणजे त्यांचा विडंबनगीतांचा संग्रह अगोदर बाहेर पडेल म्हणून मी वाट पहात होतो. पण आज हातीं आलें आहे त्यांचें पुस्तक 'आताशी-मगाशी.' त्यांच्या लेखांचा अभिनव प्रकाशनाच्या वा. वि. भटांनीं काढलेला अभिनव संग्रह. या पुस्तकाला प्रास्ताविक लाभलें आहे प्रा. म. वि. राजाध्यक्षांचें. या प्रस्तावनेंतून शां. शं. रेगे यांचें एक लोभनीय शब्दचित्रच प्रा. राजाध्यक्षांनीं जिव्हाळ्यानें रेखाटलें आहे. शां. शं. रेगे यांच्याकडून त्यांच्या विविध अपेक्षा आहेत. विनोद हें त्यांचें एकमेव अंग नव्हें असें त्यांना म्हणायचें आहे. दुसरीहि अंगें रेग्यांनीं सुकूं देऊं नयेत असें त्यांनीं सुचविलें आहे. 'आताशी-मगाशी' वाचल्यावर प्रत्येक वाचकाला पण प्रा. राजाध्यक्षांच्या मतांशीं सहमत व्हावेसें वाटेल. एकूण तेरा लेखांचा हा संग्रह. सर्वत्र लेखांचें स्वरूप कमी अधिक विनोदाचेंच आहे. मात्र रेग्यांच्या विनोदाचें वळण आजवरच्या प्रस्थापित विनोदी लेखकांच्या वळणाचीं आडवळणें घेत नाहीं. त्यांचा असा एक खास स्पर्श या सर्व लेखांतील आशयाला अलिप्ततेनें वावरूं देतो म्हणूनच विनोदाची खवचट पखरण झाली असूनहि खदखदून हंसूं उमटत नाहीं. 'आताशी मगाशी' हा लेख माझ्या आठवणीप्रमाणें प्रथम 'दीपावली'त प्रसिद्ध झाला होता. त्यांतील व्यंगोक्ति त्या सद्गृहस्थ 'टंङ्कलोग' लेखकावर रोखली होती. त्यांना तो लेख वाचून काय वाटलें असेल कुणाला ठाऊक! पण ती अचूक लागू पडली असली पाहिजे याबद्दल वाचकांना संदेह वाटूं नये. 'जपान'चे मनःपूत पान केल्याचा आव आणून-झिंगून लिहिलेल्या व त्यावेळीं प्रसिद्ध होणाऱ्या लेखांचें हें विडंबन शां. शं. रेग्यांच्या लेखणीचें सामर्थ्य सहजतेनें प्रकट करतें. त्यांच्या विनोदनाची स्थायी प्रवृत्ती 'आताशी-बताशीं'त जशी तटस्थेनें व्यक्त होते तितकींच ती 'धन्य धन्य कविवर्य म्हाळसाकांत' या लेखांत खट्याळपणाचं स्वरूप धारण करतें. ॲडिसनच्या 'नेड सॉफ्टली'ची आठवण करून देणारा हा 'कविवर्य' आपल्या सभोंवार आजकालच काय पण प्राचीन काळापासून वावरतच असतो. आजच्या 'समरकाव्यां'च्या समृद्धींत असाच एखादा–आणखी एकादा 'कवि' रेग्यांनीं जरूर रंगवावा, आणखी दोन वैशिष्ट्यपूर्ण लेखांचा विशेष उल्लेख करायचा म्हणजे 'कांहीं साहित्यिक रोग आणि त्यावर उपाय—' 'माझे लेखनकलेंतील प्रयोग,' 'आपलेंच दांत आणि आपलींच मुलें'... विनोदनिर्मितीसाठीं शां. शं. रेगे उपरोध, उपहास, व्याजोक्ति, व्यंग्योक्ति इत्यादि हुकुमी साधनांचा हटकून वापर करतात. पण, तो आत्यंतिक हळुवारपणें. हास्याचीं कारंजीं आणि धबधबे जिथें ते सहज निर्माण करूं शकले असते तिथेंच ते स्वतःला विलक्षण संयमानें आवर घालतांना दिसतात व मग अबोल मिस्किलपणाची मर्यादित उपयोजना करून वाचकाला मिशींतल्या मिशींत हंसावयाला लावतात. 'टॅक्सी' हा अनेकांचा अनेक वेळीं विनोदाचा विषय झाला आहे. कै. दत्तू बांदेकरांचा त्या संदर्भांतील स्फोटक विनोद आठवावा. पण तोच विषय शां. शं. रेगे हाताळतात तेव्हां त्यांतील विनोद कुठेंच अवखळ न होतां हळुहळू बुद्धीची मात्र सुदृढ पकड घेतो व मग सौम्य उपहासाचं आवरण तेवढेंच जाणवूं लागतं अन् हंसूं उमटतं न उमटतं तोंच वाचक गंभीर होतो. उरतें तें एक केवळ शब्दचित्र. टॅक्सीचें आणि त्या टॅक्सीवाल्यांचें. 'रवि गेला रे सोडुनि आकाशाला' या लेखाचा उल्लेख मी आवर्जून करीत आहे. यांतील जानमहंमद व पुणेरी लेखक केवळ क्षणाची करमणूक चित्रें नसून, त्यांतील विडंबन हें साहित्यिकांच्या विश्वांतील एक वास्तव दर्शन बनून समोर येतें. हें दर्शन देतांदेतांच एका विख्यात व्यक्तिचित्रकाराच्या शैलीचा विडंबनात्मक आविष्कार पण श्री. शां. शं. रेगे यांनीं या लेखांत चपखलपणें साधला आहे. कौटुंबिक सहलींतील कुटुंब रेग्यांच्या स्वभावनिष्ठ विनोदाचं आणखी एक आगळं वैशिष्ट्य प्रस्थापित करते. शां. शं. रेगे यांचे मानवी स्वभावाचें निरीक्षण सूक्ष्म व व्यापक असं आहे. गेल्या कित्येक वर्षांत त्यांनीं मुंबापुरींतील मराठी साहित्याच्या विश्वांत अप्रकटपणें (Incognito) विपुल संचार केला आहे. त्या विश्वांतील 'ठग' 'नग' 'रोग' व 'रेग' त्यांनीं अचूक टिपले आहेत. त्या त्यांच्या सामर्थ्याची केवळ 'आताशी बताशी' ही एक सूचना आहे असें वाटतें. डिकन्सच्या 'पिकपिक'च्या शैलीवर एखादा अखंड 'म्हाळसाकान्त' ते लिहूं शकतील. तो 'चमत्कार' ते केव्हां करवून दाखवितात इकडेच प्रस्तुत समीक्षकांचे डोळे लागले आहेत. असें त्यानें म्हटलें तर अगदींच (किंवा न वाचल्यामुळेंच) माझ्या चतुरस्र प्रतिभेचें कौतुक करणाऱ्या त्यांच्या सज्जन मित्रांत त्यांनीं माझी गणना करूं नये..

**आताशी मगाशी**–ले.–शां. शं. रेगे, अभिनव प्रकाशन, मुंबई–१२

—प्र. श्री. नेरुरकर






## एक विदग्ध काव्यात्मा

मराठींतील चरित्रवाङ्मय हें फार दुबळें आहे. गेल्या पिढींतील ललित लेखकांनीं आपल्या उमेदवारीच्या काळांत प्रामुख्यानें गंभीर लिखाण केलें. फडके, खांडेकर, माडखोलकर ही त्या काळची आघाडीवरची लेखक मंडळी प्रारंभीं टीकात्मक लेखन करीत असत. आज एखाद दुसरा अपवाद सोडल्यास आमचे ललित लेखक गंभीर लेखनाकडे वळत नाहींत. अर्थार्जन आणि लोकप्रियता या दृष्टीनें गंभीर लेखन फारसें उपयुक्त ठरत नसल्यामुळें निदान आज तरी वाङ्मयाच्या बाजारांत गंभीर लेखनाला भाव नाहीं. यामुळेंच चरित्र लेखनहि फार फार मंदावलें आहे. या प्रांतांत फारशी अधिकारी मंडळी वावरतच नाहींत. जे वावरतात ते उमेदवार लेखक, अनभ्यासी भक्त अथवा शब्दजड लेखनकामाठी.

यामुळेंच अशा मंदीच्या काळांत कृ. बा. मराठे विरचित 'बालकवि' या ग्रंथाचें मनःपूर्वक स्वागत केलें पाहिजे. परिसरांतील मित्रगण अथवा स्तुतिपाठक सोडून एका अप्रसिद्ध लेखकांची ही कृति मौज प्रकाशननें प्रसिद्ध करण्याचें धैर्य दाखवलें याबद्दल त्यांचेंहि कौतुक केलें पाहिजे. गेलीं पंचवीस वर्षें हें चरित्र लेखकाकडे धूळ खात पडलें होतें ही घटना आमच्या रौप्यमहोत्सव साजरा करणाऱ्या प्रकाशकांच्या वाणिज्य वृत्तीवर चांगलाच प्रकाश टाकणारी आहे.

'बालकवि' या विषयाचें कौतुक या पिढींत मागें पडलें होतें. पण कविश्रेष्ठ मर्ढेकरांनीं बालकवींचें अपूर्वत्व मान्य केल्यामुळें आमच्या नवथर कवींना आणि टीकाकारांना बालकवींच्या मोठेपणाचा अचानक साक्षात्कार झाला, आणि त्यामुळें बालकवींच्या काव्यावरची धूळ मोठ्या भक्तिभावानें झटकली गेली. प्रस्तुत चरित्रांत बालकवींच्या जीवनचरित्रांसंबंधीं माहिती मिळविण्यासाठीं चरित्रकाराला जी यातायात करावी लागली, जे बरे वाईट अनुभव आले त्यांचें वर्णन करणारें 'सिंहावलोकन' हें प्रकरण म्हणजे श्रेष्ठ मराठी साहित्यिकांच्या सहवासांत वावरण्याचें भाग्य लाभलेल्या दुर्भागी माणसांच्या मनोवृत्तीवर विदारक प्रकाश टाकणारें आहे. विशेषतः ज्यांच्या वाङ्मयाचें आणि व्यक्तिमत्त्वाचें अपरंपार कौतुक झालें आहे अशा कै. लक्ष्मीबाई टिळक आणि आईवडिलांची पुण्याई सांगणारे त्यांचे चिरंजीव 'देवदत्त टिळक' यांची या पुस्तकांतील हकीगत अजब, आश्चर्यकारक आणि उद्वेगजनक आहे.

अशा प्रतिकूल परिस्थितींतून, स्वतःची पदरमोड करून श्री. मराठे यांनीं हें लेखनकार्य केलें आहे. श्री. मराठे यांची ही पहिलीच कृति असावी. ते कसलेले लेखक नाहींत हेंहि एकापरीनें चांगलें झालें आहे. कारण त्यामुळें चरित्राला एक प्रकारचा अकृत्रिमपणा आणि मनमोकळेपणा आला आहे. चरित्रलेखक चरित्रनायकाच्या सहवासात कधींच न आल्यामुळें आत्मस्तुति, आत्मबढाई इत्यादि ठरीव दोष या ग्रंथांत मुळींच नाहींत. उलट अलीकडे आमच्या ख्यातनाम लेखकांच्या आत्मवृत्तांत आढळणारी आत्मश्लाघा, सत्यापलाप, परनिंदा या दुर्गुणांपासून हें चरित्र पूर्णपणें मुक्त आहे.

बालकवींच्या जीवनचरित्राचे बरेचसे धागेदोरे अजून अज्ञात आहेत असें या चरित्रावरून दिसतें. या दोनशें पृष्ठांच्या चरित्रांत प्रत्यक्ष चरित्राला अवघीं नव्याण्णव पानें मिळालीं आहेत. पहिल्या तीस पानांच्या प्रकरणांत जळगांवच्या कविसंमेलनापर्यंतचा म्हणजे बालकवींच्या उदयापर्यंतचा भाग आहे. कवीचें चरित्रलेखन ही अत्यंत अवघड अशी बाब आहे. त्याला तेवढ्याच सामर्थ्याचा प्रतिभाशाली लेखक हवा. एखाद्या असामान्य कवीच्या जीवनावर एखादें नाटक लिहिणें ही जशी नाजूक किमया आहे तशीच त्याचें चरित्र लिहिणें ही एक कसरत आहे. श्री. मराठे यांचें सामर्थ्य अनेक वेळां उघडें पडतें. त्यांचा तोल अनेकवेळां जातो. चरित्रविषयाबाबत त्यांच्याकडे अनिवार निष्ठा आणि भक्ति आहे आणि तीच कांहीं वेळा रसहानि करते. त्यांच्याकडे काव्यात्मता कमी आहे आणि कवीची काव्यप्रतिभा कसकशी विकसित होत गेली, भोंवतालची परिस्थिति, व्यक्ति आणि त्यांचें भावजीवन यांच्या संस्कारांतून त्याचें काव्यजीवन कसें फुललें याचें भावरम्यचित्रण काढणें म्हणजे एक कसोटीच होती. ही सूक्ष्म तरलता-ही भावस्पर्शी बैठक मराठे यांच्याकडे नाहीं त्यामुळें बऱ्याच वेळां ते रुक्ष निवेदक, सत्यकथन करणारें नोंदणीकार या ढोबळ भूमिकेंत वावरतात. बालकवींच्या भावजीवनाचा शोध घेण्याचें, त्यांच्या अंतरंगांत शिरण्याचें धैर्य त्यांना झालें नाहीं.

आणि यामुळेंच अनेक हृद्य घटना-नुसत्या रोखठोक भाषेंत सांगितल्या आहेत. विशेषतः रमाईसारखी एक मानलेली प्रिया बालकवींच्या भावजीवनांत अंधुकपणें वावरत होती असा ते दाखला देतात. अखेरच्या क्षणीं केवळ 'रमाई'चे विचार त्यांच्या डोक्यांत होते. आणि त्यामुळें नियतीची दिशा उमगली नाहीं. हा तारा निखळला. केवढी चटका लावणारी घटना. बालकवींच्या काव्यजीवनांतील ही कारुण्याची मखमल- केवढें नाट्य भरलेलें आहे त्यात. पण चरित्रकार त्याला कांहींच स्पर्श करतात.

आणि हें सारें टाळून असूनहि-त्याचें बालकवींच्या काव्यावरचें विवेचन अत्यंत तुजवां-प्राध्यापकीय थाटाचें झालें आहे. बालकवींच्या काव्याचा त्यांना नवा अर्थ कांहीं लावतां आला नाहीं-तुटलेले दुवे नीट जोडतां आले नाहींत.

बालकवींचीं सुमारें ३६ पत्रें या संग्रहांत आहेत. त्या पिढींतील साहित्यिक किती भावविवश आणि संवेदनाक्षम होते याचा प्रचीती येते. 'अप्रकाशित गडकरी' या पुस्तकांत गडकऱ्यांचीं पत्रें याच वळणाचीं आहेत.

लघुकथा आणि कादंबरी यांच्या भाऊगर्दींत एक अस्सल प्रामाणिक प्रयत्न म्हणून श्री. कृ. बा. मराठे यांच्या बालकवींचें मोल फार मोठें आहे. प्रत्येकानें आवर्जून वाचावा असा हा अलिकडचा कवि-चरित्रलेखनाचा एक ठळक प्रयत्न. अनेक तरुण कवींना-कविभक्तांना आणि चरित्र-लेखकांना स्फूर्ति देणारा. बालकवींचे पहिले चरित्रकार-श्री. मराठे यांचा काव्यरसिकांची आजची पिढी सदैव ऋणी राहील.

सव्वादोनशें पृष्ठांच्या या पुस्तकाची १२॥ रुपये ही किंमत हा अति व्यवहारवाद झाला. आठ आण्याला दोनशें पानांची कोरी वही मिळतें हें त्यावरचें अलिकडचें एका मातबर व्यवहारी प्रकाशकांचें उत्तर वाचकांची सहनशीलता पहाणारें आहे. पण सांप्रत या ग्राथिक व्यवहारवादामुळें असलीं चांगलीं पुस्तकें ठरीव ग्रंथालयांतच बंदिस्त होत असून मराठी वाचक त्यांना पारखा होत आहे हें सत्य आहे.

**बालकवि**:—ले. कृ. बा. मराठे, प्रकाशक—मौज प्रकाशन; मूल्य १२–५०

**—बाळ सामंत**

## भावचित्रांची एक कैफियत

खरं म्हणजे चांगल्या ग्रामीण कथांची दुर्मिळताच भासते.

मराठी ग्रामीण कथा खऱ्या अर्थानें विकास पावली आहे काय, असा केव्हां कांहीं टीका-






कारांना प्रश्न पडतो तेव्हां, पुष्कळदां निरुत्साही उत्तर पुढयांत आल्याचें प्रत्ययास येतें. ग्रामीण कथा जेव्हां केव्हां ग्राम्य होऊं लागतें तेव्हां तर मराठीच्या एका वाङ्मयाच्या क्षेत्रावर बलात्कार होऊं लागल्याचें उघड्या डोळ्यांनीं पहाण्याचें दुर्भाग्य येतें. पण त्यांतहि ज्या कांहीं सुजाण ग्रामीण कथाकारांनीं आपली अस्मिता जागृत ठेवली त्यांत शंकरराव खरातांचा निर्देष न करणें कृतघ्नपणाचें ठरेल.

'बारा बलुतेदार' 'ते सांगावा' म्हणजे खरातांच्या विचारचित्रांची व भावचित्रांची कैफियतच होय. त्यांचीं 'माणसें' माणुसकीनें जगणारी, अपार श्रद्धेला गोंजारणारी असावीत हीं त्यांच्या जीवनानुभूतीचीं निदर्शकेंच होत.

श्री. खरातांचा हा 'सांगावा' तिसरा. पण तीनही एकाहून एक सरस–वाचनीय. मात्र 'सांगावा' ही कलाकृति जरा वरचढच वाटते. कारण पहिल्यापेक्षां नंतरच्या कृतींत प्रगल्भता जास्त असते. खेड्यांतल्या दैनंदिन जीवनाभोंवती रिंगण घेत 'सांगावा' सरळ त्यांच्या दुःखाला हात घालतो. त्यांच्या अनेक समस्यांना दिशा देतो आणि कोरड्या नदींत एखाद्या पाण्यानें भरलेल्या डबक्यासारखा विनोद सापडला तर तो वेधून घेतो. अशा प्रकारें श्री. खरातांच्या या कथासंग्रहांत दुःख, प्रणय, विनोद आणि लफडा अशीं विविधता सांपडेल. पण बहुतांशीं कथांमधून दुःखाचा गाभाराच अधिक खोल गेलेला दिसतो.

कथासंग्रहांत एकंदर चौदा कथा आहेत. पण प्रत्येकाचा आशय व विषय वेगवेगळा. यापैकीं 'सांगावा' ही पहिलीच कथा. रामा महार स्वतः उपाशीं पोटीं व बायका–पोरांना सुद्धां उपाशी ठेवून इनामदाराच्या घरचा मृत्यूच्या वार्तेचा 'सांगावा' घेऊन जातो. अपेक्षेप्रमाणें त्याच्या चाकरीचा पोटांत कोंबण्याइतका तुकडा मिळू नये, ह्याचा विषाद वाटतो. 'पाणी' व 'देवीचा कोप' या कथांतून एका दूर लोटल्या गेलेल्या उपेक्षित समाजाच्या दारुण व्यथेची दखल लेखकानें आपलें हार्दिक कारुण्य व्यक्त करून घेतली आहे. त्यांच्या समस्यांना व अन्यायाला वाचा फोडली आहे. प्रेमाच्या संबंधाचा व माणुसकीच्या नात्याचा खरा अर्थ 'माया' ही कथा समजावून सांगते. माणसापेक्षां प्राणिमात्रांत किती माया असूं शकते, ह्याचं खरं प्रत्यंतर या कथेंत येईल.

मात्र या संग्रहांतील उत्कृष्ट आणि सरस कथा म्हणून 'लागीर' व 'भानगड' या कथांचा निर्देश करावा लागेल. नीतिमत्तेच्या बाबतींत खेड्यांत आढळणारी तीव्रता या कथांतून चांगलीच व्यक्त होते. 'लागीर' या कथेंतील रिकामटेकड्या नवऱ्यानें परपुरुषाशीं आपल्या बायकोचा संबंध आहे या नुसत्या संशयानें हांकलून दिलेल्या तानीच्या हातून अजाणता किंवा जाणतेपणीं घडलेल्या पापकर्माबद्दल ती स्वतः पश्चाताप करते. तिचं जळलेलं–पोळलेलं मन तिला डिवचत असतं. पण सर्वच जण तिला मोठी 'लागीर' झाली असावी, असें भासवित असतात. मात्र तानी आपली व्यथा 'आत्या तुमाला कसं सांगूं...!' या जीव तोडून बोललेल्या शब्दांत व्यक्त करते. तर 'भानगड' या कथेंत आपली तरणीताठी मुलगी आपली इभ्रत मातींत घोळून एका मास्तराबरोबर पळून गेली म्हणून आपल्या जीवनाचा अंत करायला निघालेली गुणाबाई सुद्धां अंतःकरण पिळवटून टाकते. या दोन्ही कथांतील इभ्रतीच्या तीव्रतेंतून निर्माण झालेला संघर्ष हृदयस्पर्शी व मनाला चिरे पाडणारा आहे.

अशाप्रकारें 'सांगावा' मधली प्रत्येक कथा मनाला धक्के देत सामोरी जाते. कथांतील प्रसंग व व्यक्ति हृदयाचा ठाव घेतात. भिकाऱ्याची मयत 'पंचनामा' झाल्यावर वर्गणी करून भिकारीच घेऊन जातात. ह्यांतील वर्णन हिडीस वाटत नाहीं तर एका दारुण घटनेची दग्धता उभी करते. तशा 'डाव' 'वांटा' 'धोंड्या बेरड, ह्या कथासुद्धा मनाचा ठाव घेणाऱ्या आहेत. दुसरीकडे नजर टाकली की दग्ध व पिचलेल्या जीवनप्रवाहांत सुद्धां विनोद असतो, ह्याची जाणीव 'तमाशा' पाहून होते. 'धाड' येणार म्हणून दागदागिने गवतांत लपवून ठेवणारी म्हातारी, तिची नेभळट मुलगा संतू व झोपा घेणारी सून राधा क्षणभर हंसवून सोडतात. देवीचं 'नवस' फेडण्यासाठीं तात्यानं नानांच्या मळ्यांतून चोरलेल्या कोंबड्यानें बांग देवून ऐनवेळीं तात्याच्या चोरीचं बिंग फोडावं. 'नवस' या कथेंतील हा विनोद पक्का स्मरणांत राहतो.

श्री. शंकरराव खरातांच्या या 'सांगावा' ची निवेदनशैली रोचक आहे. कथनांतील ग्रामीण शब्दांची पखरण मराठमोळ्या ग्रामीण व्यक्तींच्या अंतरंगाचा परिचय करून देते. लहान लहान पण नीटनेटक्या वाक्यांत आणि मोजक्या शब्दांत कथासूत्रें बंदिस्त करण्यांत लेखकानें कमालीचें कौशल्य दाखविलें आहे. परंतु कांहीं कथा वाचतांना लेखकानें कथानकच उठावदार करण्याकडे जास्त लक्ष पुरविलें कीं काय, असा भास होतो. 'लागीर', 'भानगड', 'माया', 'सांगावा' या कथांतील पात्रें मनाला हेलावून सोडतात पण चिरकाल डागणी देत नाहींत. ह्याचें कारण, व्यक्तिरेखा रंगविण्याकडे लेखकाचें जरासें झालेलें दुर्लक्ष असूं शकेल. तानीच्या मनाचें विश्लेषण मानसशास्त्राच्या पाठबळावर केलें गेलें असतें तर तानी दुबळी वाटली नसती. तसेंच 'भानगड' अपूर्णच वाटतें. लेखकाला ज्या व्यक्ति अधिक परिणाम करून जाव्यात असें वाटतें त्याच व्यक्ति अबोल, ध्येयशून्य वाटतात तर उलट त्या व्यक्ति लेखकाला उठावदार करायच्या नसतात, त्याच नेमक्या परिणाम करून जातात.

लेखकानें आपलीं मानसपुत्रें अधिक शक्तिशाली करायला हवी होती.

एकंदरींत श्री. खरातांचा 'सांगावा' हा अस्सल ग्रामीण कथासंग्रह वाचण्यासारखा नटलेला आहे, एवढें सांगितलें कीं त्याचें कलात्मक मूल्य वाचकांच्या ताबडतोब लक्षांत यायला हवें !

**सांगावा**:–ले.:–शंकरराव खरात, कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणें. किं. ३–५० रु.

—**मधुकर कोसारे**

●●●

## साभार-पोंच जून–जुलै १९६३

**शेक्सपिअर**
लेखक–अजय आरोसकर, प्रकाशक–वोरा ॲन्ड कं. रु. २–००

**पौलोमी**
लेखक–सुव्रत, प्रकाशक–गोकुळ मासिक प्रकाशन, रु. ३–००

**वानगी**
लेखक–उद्धव शेळके, प्रकाशक–पॉप्युलर प्रकाशन, मुंबई. रु. ६–००

**निम्मा शिम्मा राक्षस**
लेखक–रत्नकर मतकरी, प्रकाशक–पॉप्युलर प्रकाशन, मुंबई. रु. २–००

**झिपऱ्या आणि रत्नी**
लेखक–शंकर सारडा, प्रकाशक–पॉप्युलर प्रकाशन, मुंबई रु. १–५०.

●●●






अनुक्रमणिका




## श्री. शंतनुराव किर्लोस्कर

**६० व्या वर्षात पदार्पण**

महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध उद्योगपति व किर्लोस्करवाडीचे एक आधारस्तंभ, श्री. शंतनुराव किर्लोस्कर यांनीं दि. २८ मे रोजीं एकसष्टाव्या वर्षांत पदार्पण केलें. त्यांचें तडफदार व्यक्तित्वं, धंद्यातील स्फूर्ति व धडाडी पाहून त्यांना एकसष्टावें वर्ष लागलें हें ऐकून कित्येकांना आश्चर्य वाटल्याशिवाय रहाणार नाहीं. त्यांचें व्यक्तिमत्वच तसें उठावदार आहे.

महाराष्ट्राच्या औद्योगिक प्रगतीचा आराखडा नजरेसमोर आणला तर, अस्सल मराठी बाणा, भाषा व संस्कृति असलेल्यां माणसानें केलेली औद्योगिक क्रांति 'किर्लोस्कर' च्या रूपानें डोळ्यासमोर उभी राहते. श्री. शंतनुराव महाराष्ट्राच्या उद्योगधंद्यांतील एक प्रेरणा आहे. महाराष्ट्रांत जी कांहीं मराठी माणसें धंद्यात प्रगत झाली आहेत किंवा होत आहेत, त्यांत श्री. 'किर्लोस्कर' हे शिरोमणीच होत. श्री. शंतनुरावे हे केवळ स्वतःच्याच उद्योगधंद्यांत रममाण झाले असें नाहीं तर, त्यांचे इतर कंपन्या व संघटनांशीं सुद्धां अतिशय घनिष्ठ संबंध आहेत. महाराष्ट्रांत व भारतात औद्योगिक विकासाचें योग्य वातावरण निर्माण करण्यात त्यांचा हातभार अति मोलाचा आहे. त्यांनीं स्वतः किर्लोस्करवाडी, पुणें, बंगळूर, हरिहर व सोलापूर येथें कारखान्यांची उभारणी करून छोट्या कारखान्यांना व धंद्यांना चालना दिली. निर्यातवाढ व व्यवस्थापकीय शास्त्राचा विकास या क्षेत्रात ते जिव्हाळ्यानें काम करीत आहेत. कित्येक कारखानदारांस त्यांनीं दिलेलें उत्तेजन व सक्रीय सहकार्य विशेष उल्लेखनीय आहे. यासाठीं त्यांनीं हल्लीं किर्लोस्कर फाऊंडेशनची स्थापना सुद्धां केली आहे. भारताच्या संरक्षणोपयोगी उद्योगांतील त्यांनीं स्वीकारलेलें आव्हांन व भागीदारी त्यांच्या जिव्हाळ्याचें व आत्मीयतेचें प्रतीक म्हणावें लागेल.

श्री. शंतनुराव किर्लोस्कर यानीं संपादन केलेली यशस्विता त्यांची तर आहेच आहे, पण ते साऱ्या महाराष्ट्राचें व मराठी माणसांचें यश आहे. महाराष्ट्र नेहमीच गुणावंतांचें कौतुक व सत्कार करीत आला आहे. औद्योगिक कार्यसुद्धां राजकीय, सामाजिक व सांस्कृतिक क्षेत्रांतल्या कार्याइतकेंच महत्वाचें आहे. औद्योगिक माणूसहि समाजसेवा करीत असतो. तेव्हां या समाजसेवेचा व यशस्वितेचा योग्य सन्मान व सत्कार होणें अत्यावश्यक आहे.

श्री. शंतनुरावांच्या ६१ व्या वाढादिवसानिमित्त 'दीपावली' तर्फे अभीष्टचिंतन करून त्यांस दीर्घायुष्य इच्छितों !

## श्री. रामनाथ व नरसिंगदास चांडक

**यांच्या थोर अंतःकरणांची ग्वाही**

दि. २ जून रोजीं श्री. रामनाथ नरसिंगदास चांडक आर्टस् कॉलेजचा उद्घाटन समारंभ नासिक येथें ह. भ. प. प्राचार्य सोनोपंत दांडेकर यांच्या हस्तें मोठ्या थाटांत व उत्साहांत पार पडला. नासिक व त्याच्या आसपासच्या चाळीस मैलाच्या परिसरांतील लोकांच्या जीवनांतील ही एक अविस्मरणीय घटनाच म्हणावी लागेल. 'दीपावली 'चे एक हितचिंतक श्री. रामनाथशेट व त्यांचे बंधू श्री. नरसिंगदास चाडक याच्या या उदार देणगीमुळें नासिकच्या आसमंतांत या कॉलेजच्या रूपानें शैक्षणिक फुलोरा फुलूं लागला आहे. हा फुलोरा फुलविण्याचें महत्कार्य सिन्नरचे प्रसिद्ध बिडी कारखानदार श्री. बस्तीराम नारायणदास महेश्री यांचे भाचे श्री. नरसिंगदास व त्यांचे बंधू श्री. रामनाथशेठ चाडक याच्या अलौकिक दातृत्वानें घडून आलें आहे. नाशिककरांच्या पूर्वजन्मींच्या पुण्याईमुळें म्हणा किंवा श्री. चांडक बंधू याच्या ऋणानुबंधानें म्हणा, हा एक अप्रतिम योगायोग घडून आला.

मोठ्या व्यक्तींची पुण्याई जर एखाद्या कार्यास लागली तर तें कार्य भारंभार फळरूपास येतें. त्यांतल्या त्यांत शिक्षणासारख्या नैतिक महान कायास ही पुण्याई लागली तर तें महापुण्यच ठरणार ! अशी ही श्री. चाडक बंधूंची पुण्याई नाशिक रोडच्या कला महाविद्यालयामागें उभी आहे. तसें श्री. नरसिंगदास शंकरलाल चांडक व त्याचे बंधू श्री. रामनाथ शंकरलाल चांडक ही सर्वच मंडळी धर्मभिरू, सात्विक आणि सोज्वळ मनाची आहेत. सत्वगुणानें घडविली आहेत. लक्ष्मी ही नेहमीच स्वतः बरोबर ताठा आणि अहंकार घेऊन येते. मात्र या बंधूद्वयाबद्दल तसें दिसत नाही. श्री. चाडक बन्धू याची वृत्ति त्यागी, विरागी आहे. त्यांना पाहिल्यावर त्याच्यात नम्रता व विनयशीलता असल्याचेंच प्रत्ययास येतें. अशा त्याची सात्विक गुणावर आधारलेली उदार व्यक्तिरेखा कला महाविद्यालयाच्या रूपानेंच नाहीं का स्पष्ट होत ?

श्री. चांडक बंधू हे स्वतःचा उद्योग व कारखाना साभाळून लोकहिताकडेहि जिव्हाळ्यानें लक्ष पुरवितात. त्याची लोकहित दृष्टि नासिकच्या व सिन्नरच्या लोकांना चागलीच परिचित आहे. श्री. नरसिंगदास व श्री. रामनाथशेट यानां कला महाविद्यालयाच्या इमारत उभारणीकरितां ५० हजार रुपयाची पहिली भरीव देणगी देऊन एका पावन कार्याचा शुभारंभ केला आणि आज तेंच कला महाविद्यालय मूर्तरूप धारण करून शैक्षणिक क्षेत्रात साकार झालें आहे. श्री. चाडक बंधूंच्या या कार्याचें आम्हीं स्नेहपूर्ण अभिनंदन करून महाविद्यालयाला शुभ यश चिंतितो !

## मा. दत्ताराम

**सत्कारणीं लागलेलें आयुष्याचें अर्धशतक**

कलावंताचा सत्कार कलावंतानीं करावा याच्यासारखें अहोभाग्य दुसरें आणिक कोणतें ! समव्यवसायी म्हटला कीं तो हेव्यादाव्याचा विषय हे अगदीं ठरून गेलें होतें. आपल्या या महाराष्ट्रांत तर ही परंपराच नांदत आलेली. आणि कांहीं श्रेष्ठ लोकांच्या वर्तनानें त्यावर शिक्कामोर्तब झालेलें होतें; परंतु सुदैवानें






ही परिस्थिती हळूहळू पालटूं लागलेली दिसते आहे. समान तोलाच्या माणसांकडून ; गुणगौरव होणें ही नवलाची गोष्ट घडूं लागलेली आहे ; परंतु नटाचा सत्कार व गौरव उत्स्फूर्तपणें नटांनीच करणें अशा गोष्टी फार दुर्मिळ. नट आाण तोहि चांगला जोमांत असतांना त्याच्या समव्यावसायिकानीं मुक्तकंठानें केलेलें त्याचें गुणगान ऐकताना जसें खुद्द त्या नटाला तसेंच त्या समारंभाला हजर राहणाऱ्या प्रेक्षकालाहि धन्य धन्य वाटतें.

## कोंकणी जिभेवर उत्कृष्ट मराठी

असाच एक गुणगौरव समारंभ गेल्या महिन्यात झाला. मुंबापुरस्थ बहुसंख्य मान्यवर नटांनीं मास्टर दत्ताराम वळवईकर या नटश्रेष्ठाचा त्याच्या वयाला एकावन्नावें वर्ष लागल्याबद्दल तो केला. दत्तारामनीं आयुष्यांतलीं चाळीस वर्षें रंगभूमीची एकनिष्ठेनें सेवा केली. या चाळीस वर्षांत त्यांनीं उपसलेले कष्ट, लोकाभिमुख होताना भोगलेल्या यातना आणि नाटकी विश्वांत सदैवपणें वाट्याला येणारे मानापमान मुकाट्यानें सहन करीत मराठी नाट्यसृष्टींत नटश्रेष्ठ ही मानाची पदवी त्यांनी मिळविली—नव्हे नाट्यरसिकांनीं उत्स्फूर्तपणें त्यांना ती दिली. दत्ताराम हे गोमंतकीय. त्यांची जन्मभाषा कोंकणी; गेल्या पाऊणशें वर्षांत अनेक गोमंतकीय नटांनीं मराठी रंगभूमीवर नाव गाजविलें परतु दत्तारामसारखा उत्कृष्ठ मराठी भाषा बोलणारा गोमंतकीय नट झाला नाहीं, हें नाट्येतिहासाचें ज्ञान असणारे लोक निर्विवादपणें कबूल करतील. नुकताच 'गोवा हिंदु असोसिएशन' या संस्थेनें त्यांचा सत्कार केला त्यावेळीं एकंदर साठाच्या आसपास संस्थांनीं पुष्पहार घालून जो त्यांचा सत्कार केला त्यावेळीं त्यांची गोड लोकप्रियता कळून आली, आणि वाटलें हा नुसताच नट नाहीं, तो एक गोड माणूसहि आहे.

नटवर्य या पदवीला खरोखरीच पात्र असणारे फार थोडे कलावंत आज रंगभूमीवर वावरत आहेत. मास्तर दत्ताराम हे त्यांतल्या प्रथम श्रेणीचे. त्यांच्या एकावन्नाव्या वाढदिवशीं त्यांना दीर्घायुरारोग्य चिंतितों आणि त्यांच्या हातून रंगभूमीची भरीव अशी सेवा घडो अशी इच्छा प्रदर्शित करतो.

## श्री. वि. ना. आडारकर

### चित्रकला क्षेत्रांतले भारी व्यक्तिमत्व

चित्रकार असूनहि धडाडीचीं समाजकार्यें करणारीं माणसें आपल्या या महाराष्ट्रांत फार थोडीं आहेत. राजकारण म्हटलें कीं कोल्हापूरच्या माधवराव बागलांखेरीज जसें अन्य कुणी दृष्टीसमोर येत नाहीं, तसेंच आजकाल–सरकारी असो निमसरकारी असो–कोणत्याहि भव्य सांस्कृतिक कार्याची कलात्मक उभारणी श्री. वि. ना. उर्फ दादासाहेब आडारकरांशिवाय पुरीच होऊं शकणार नाहीं, असें समीकरण आज तरी ठरून गेलेलें आहे. कलावंतांत अशीं जिद्दीचीं, धडाडीचीं माणसें विरळा. आपण सुखी झालों कीं बस्स ! अशी वृत्तीच सरास आढळून येते. आडारकरांचें तसें नाहीं. स्वात्मसुखाबरोबरच अन्यांचें कल्याण व्हावें या इच्छेनें ते सदैव झटले. जे. जे. स्कूल ऑफ अप्लाइड आर्ट ही प्रचंड संस्था त्यांच्यामुळें आज रौप्यमहोत्सव पाहूं शकली. आज हिंदुस्थानांत व्यापारी चित्रकला, मुद्रणाचीं शास्त्रोक्त विद्यालयें आणि व्यापारी चित्रकला विभागांत पाश्चात्यांच्या तोडीस तोड चित्रकार उभे करून तो विभाग अत्यंत समृद्ध करण्याचें श्रेय आडारकरांना आहे. त्यांची ही सर्व चोख सेवा लक्षांत घेऊन अखिल भारतीय जाहिरात विभागानें त्या विभागांतील सर्वश्रेष्ठ माणूस म्हणून दादासाहेबांचा गौरव करून त्यांना 'इसा खटाव सुवर्णपदक' दिल्याचें जाहीर केलेलें आहे.

दादासाहेबांना हा जो मान मिळाला तो योग्य असाच आहे, असा निर्णय प्रत्येकजण देतो आहे. 'कलानगर' या भव्य वास्तूची निर्मिति दादासाहेबांनीं केली. 'इंडस्ट्रियल डिझाइन' या अत्युच्च कलेचा समावेश यंदापासून ते आपल्या संस्थेच्या अभ्यासक्रमांत करणार आहेत. महाराष्ट्र राजमुद्रेचें निर्माते दादासाहेब आहेत. दादासाहेबांचीं अशीं अनेक प्रचंड सार्वजनिक कामाची मालिका सांगतां येईल परंतु तो स्वतंत्र विषय असल्यामुळें तूर्त या अभिनंदन प्रसंगीं एवढेंच म्हणतों कीं दादासाहेब याहून प्रचंड आणि नेत्रदीपक कार्यें तुमच्या हातून घडो ! ●●●



पान ५८ वरून...

स्वकर्तव्याला विसरले आहेत व विद्यापीठाच्या प्राध्यापकाची कुसळें शोधण्यांत ते स्वतःच अधोगतीला चालले आहेत ह्याचा खेद वाटतो. किती झालें तरी गुरुजन हे गुरुजन आणि विद्यार्थी ते विद्यार्थी. 'विद्या विनयेन शोभते' हें सतवचन ग्राह्य मानलें तर विनय हा गुण आवश्यक मानला पाहिजे. आजचे गुरु हे एकाकाळीं विद्यार्थी होते व त्याकाळीं विद्यार्थीव्रत खडतरपणें पाळल्यानंतर-लोखंडाचे चणे खाऊनच ते आजच्या गुरुदेवपदीं विराजमान झाले. त्या आश्रमधर्माला आवश्यक असलेले अनालस्य, ब्रह्मचर्य, शील, गुरुजनादर, स्वावलंबन व दृढाभ्यास हे सद्गुण प्राप्त करूनच त्यांना प्रज्ञापारमिता लाभली आतां त्यांनीं गुण पुन्हां अंगी बाणवावे हा दुराग्रह विद्यार्थ्यांनीं धरणें युक्त नाहीं. गप्पा मारणें, अनियमित राहाणें, विद्यार्थिनींबाबत सापेक्ष आकर्षण असणें, विद्यार्थ्यांना तुच्छ लेखणें, गाइडसवर भर देणें व विषयाचा अभ्यास न करणें हे षड्गुण प्राध्यापक पेशाचे दंडक आहेत हें रुढीनुसार ठरूनच गेलें आहे. तेव्हां त्यांचा पुन्हां गाजावाजा करणें अत्युक्त ठरतें हें विद्यार्थ्यांच्या कसें ध्यानीं येत नाहीं ? 'जरि गुरू झाला भ्रष्ट तरी तो तिन्ही लोकी श्रेष्ठ' ही उक्ति जिथें यथार्थ मानली गेली आहे तिथें त्यांच्या आश्रम धर्मास युक्त असा व्यवहार त्यांनीं केला तर त्यांचें अभिनंदन व गुणगान करण्याऐवजीं त्यांच्याविरुद्ध विद्यार्थ्यांनीं अशी जाहीर ओरड करावी हे निषेधार्ह आहे.

●●●









## ग्रीष्म ऋतूंतला पुणेरी शिमगा——सारस्वत

कोणतीहि व्यावसायिक संघटना व्यवस्थित चालत नाहीं हा आमचा जुना अनुभव आहे. विशेषतः ज्यांत सुशिक्षित मध्यमवर्गीय घटकांचा अंतर्भाव असतो अशा संघटना प्राथमिक अवस्थेंत आपोआप फुटतात किंवा बोलाचाली होऊन डोकीं फुटल्यामुळें मोडतात हेंहि आपल्याला पटलें आहे. 'आधींच मर्कट तशांतही मद्य प्याला' ह्या न्यायानें अशा संस्था पुण्यांत निघाल्या तर त्यांत सुरवातीपासूनच पुणेकरांचें अभिजात वाग्दुकत्व उफाळून येतें आणि मग बारसें होण्यापूर्वीच त्या संघटनेचे तीन तेरा वाजरे करण्याची वेळ येते, हेंहि ऐतिहासिक सत्य आहे.

गेल्या दोन–तीन वर्षांपूर्वी पुण्यांत एक 'मराठी ग्रंथप्रकाशक सभा' नावाची संस्था स्थापन झाली. ह्या संस्थेचें ध्येय आणि कार्य ह्यांच्या तपशिलात शिरण्याची आवश्यकता नाहीं. कांहींसा प्रकाश तिच्या नांवावरून पडण्यासारखा आहे. त्यावरून तिथें प्रकाशकच एकत्रित होऊन आपलें जिव्हालौल्य शमविण्याचा उपक्रम करीत असावें असें वाटतें. ह्या संस्थेंत सर्व मराठी प्रकाशकाना एकत्र आणण्याचा प्रयत्न केलेला आढळत नाहीं. कदाचित मराठी ह्या नांवाचा शब्दशः अर्थ करून चांगलीं मराठी प्रकाशनें प्रसिद्ध करणाऱ्या 'अमराठी' प्रकाशकांना वगळलें असल्याचें समजतें. मुंबईचे इतर कांहीं नामवंत प्रकाशकही ह्या संघटनेस संलग्न झालेले आढळत नाहींत. कदाचित मराठीचा मक्ता पुण्याला ईश्वरवरदानानें प्राप्त झाल्यामुळें मुंबईच्यां शिष्ट व व्यवहारी प्रकाशकांना त्यांत रस नसावा हीहि दृढ समजूत ह्या उपेक्षेमागें असावी.

प्रस्तुत 'मराठी ग्रंथप्रकाशक सभे'नें कांहीं नेत्रदीपक कार्य केलें नसल्याच्या आरोपाला नामाभिधानांतल्या 'सभा' ह्या शब्दाचा आधार घेऊन असें स्पष्टपणें सांगता येईल कीं कांहीं करण्यापेक्षां बोलण्यावरच भर देण्याची तरतूद घटनेंत करून घेतल्यामुळें असा दुष्ट आरोप (अ) कार्यकारी मंडळावर शाबीत होऊंच शकत नाहीं. पुण्यांतल्या उपहारगृहांप्रमाणें, ग्रंथालयाप्रमाणें किंबहुना कोणत्याहि (तेच तेच काम करणाऱ्या) राष्ट्रीय, आंतरराष्ट्रीय व अराष्ट्रीय संस्थांप्रमाणें प्रत्येक घटकाला (भारतीय घटनेचा आधार घेऊन,) स्वायत्तता देण्याची सवलत ह्याही 'सभे'च्या सर्व घटकांना प्राप्त झाली आहे. प्रत्येक प्रकाशक आपापल्यापरी (व दुसऱ्यावर डोळा ठेवून) मराठी भाषेच्या सेवेला बद्धपरिकर असल्यामुळें 'दसकी लकडी एकका बोजा' ह्या उक्तीप्रमाणें प्रत्येक घटक प्रकाशकानें स्वतंत्रपणें केलेले उपक्रम (वा उपद्व्याप) संस्थेच्या खातीं चक्रवाढ व्याजानें वाढवण्याची पद्धतही इथें नांदली आहे. ह्या संघटनेचे बहुतेक सदस्य पुण्यांतले (आणि विशेषतः अप्पा बळवंत चौकांतले) असल्यामुळें परस्परांच्या हालचालींवर करडी नजर ठेवण्यासाठीं पुण्याच्या सायकल–संस्कृतीचा उपयोग तितकासा करावा लागत नाहीं. एका दुकानीं एखादा लेखक डोकावला तर दुसऱ्या दुकानीं त्याचें प्रतिबिंब पडण्याची गुप्त व्यवस्था केलेली असल्यामुळें, ह्या चौकांत शिरलेला एखादा लेखक कुणाच्या नजरेंतून (व तडाख्यांतून) सुटूं शकत नाहीं. ह्यामुळें पुण्यातले लेखक स्वतःच्या परिवाराचीं पुस्तकें खरीदण्यासाठीसुद्धां ह्या चौकांत जाण्याचें टाळतात असें समजतें. ही गोष्ट मात्र लुब्धप्रतिष्ठित लेखकांची. होतकरू लेखकांच्या बाबतींत मात्र ह्या चौकांत पूर्णपणें अनास्था आढळते.

### त्रिनकारी स्फूर्तिवचनांची बिरुदावली

असला एखादा लेखक ह्या प्रकाशकांकडे शिरला तर त्याला उत्थापन देण्याची शिष्टता ह्या चौकांत आढळत नाहीं. आजेवें केल्न (हो! सांगायचा मुख्य मुद्दा कीं हे सर्व प्रकाशक मराठी प्रकाशनें–प्रामुख्यानें आपलींच–विकण्याचा जोड व्यवसाय करीत असतात. त्यामुळें दप्तर आणि दुकान हें एकाच जागीं, एकाच पाटीवर व एकाच पोटासाठीं राखण्याची सवंग पद्धत इथें राबत असते) दुकानांत शिरण्याचा प्रयत्न एखाद्या नवथर लेखकानें केला तर त्याच्या कथालेखांचे चिकटबुक टेवून घेण्यांत येतें आणि कालांतरानें त्याची यथासांग वासलात लावण्यापूर्वीं मागील दारानें त्याचा बाजारभाव, पायपिटी खेटे, नकार व गणगोत ह्याची गुप्त चौकशी होते. ह्या होतकरू लेखकांनीं, प्रकाशनासाठीं गांठचे खर्चून वर प्रकाशकाच्या चापाण्याची सोय करण्याची तयारी दाखवली तर मात्र त्याला तत्काळ (कच्चीच) पावती मिळून रिक्शापर्यंत निरोप देण्याचें सौजन्य दाखवलें जातें. पुण्याचे हे प्रकाशक सावज पकडण्याच्या अगोदरच हाके उठवित असतात. त्यामुळें 'ह्या धंद्यांत राम नाहीं आणि (देह आडवेतिडवे सुटले तरीसुद्धां) कांहींच सुटत नाहीं. केवळ सरस्वतीच्या चरणीं आपली ही नम्र स्वार्थत्यागी सेवा असल्यामुळें जनतेनें (म्हणजे लेखकानें) आपल्याकडे सहानुभूतीनें पहावें व आपल्याबरोबर निःस्वार्थी (व सार्थ) सहकार्य करावें' अशी त्याची अपेक्षा असते. वाचकांनीं फुकट वाचूं नये, ग्रंथालयांनीं कमिशन मागूं नये व लेखकांनीं मानधन स्वीकारूं नये अशा त्रिनकारी स्फूर्तिवचनानींच मराठी प्रकाशनाचा उद्धार होईल अशी (आणि एवढीच फक्त) ह्या सभेची एकमुखी खात्री आहे.

### करायला गेलें एक

प्रतिवर्षीं (परस्पराच्या उखाळ्यापाखाळ्या व लावालाव्या) आपापसांतच सभेच्या निमित्तानें चर्चिण्यासाठीं ह्या 'सभे'ची बैठक जमते. पण तोच तोच कार्यक्रम प्रतिवर्षीं करून कंटाळलेल्यां सदस्यांनीं यंदा कांहींतरी अभिनव उपक्रम करून लेखकांवर आणि मराठी जनतेवर 'इम्प्रेशन' मारण्याचा चंग बांधला. यंदा गेल्या पंचवीस वर्षांतील (न खपलेल्या) पुस्तकांचें प्रदर्शन भरण्याची शक्कल निघाली आणि तिच्या उद्घाटनाच्या निमित्तानें पु. ल. देशपांड्यांचा एकपात्री प्रयोग व एका पारिसंवादाच्या निमित्तानें इतर उरलेल्या (होतकरू व नकारू) लेखकाची वाऱ्यावरची वरात काढण्याचें नियोजन मुक्रर झालें. पण प्रकाश-

अनुक्रमणिका

कांच्या म्होरक्यांची कांहींतरी सनसनाटी साधण्याची कल्पना मात्र यशस्वी झाली नाहीं.

पु. ल. अलिकडे फारच गंभीर बोलतात आणि हंसण्याच्या तयारीनें आलेले श्रोते त्यांचे विचारपरिप्लुत भाषण ऐकून अधिकच विचारमग्न होऊन परततात. ह्या प्रदर्शनाच्या उद्घाटनाच्यावेळीं त्यांनीं असेच एक परखड वक्तव्य गंभीरपणें सुनावून श्रोत्यांना आणि (त्यांच्यापेक्षां अधिक) कर्त्या प्रकाशकांना सुन्न केलें. नववाचक निर्माण करण्यासाठीं व वाचनाची गोडी टिकवण्यासाठीं रहस्यकथा हाच उत्तम उपाय आहे हें त्यांचे मत प्रकाशकांना विनोदी वाटण्याचा संभव आहे पण रहस्यकथांची लोकप्रियता व भरगच्च निर्मिती ह्याची जाणीव असलेल्या प्रकाशकांचे ह्या भाषणामुळें कदाचित परिवर्तन होऊन त्यामुळें बाबुराव अर्नाळकरांना मुंबईचा न चालणारा चष्म्याचा धंदा घड्याळजीला विकून पुण्याला चौथाई (सर) देशमुखी करण्यासाठीं स्थाईक व्हावें लागेल. आपल्या मौलिक प्रकाशनाची व (आपली) स्तुति पु. ल. कृतज्ञतेनें करतील ह्या अपेक्षेनें कांहीं प्रकाशक त्यांच्या भोवतीं घोटाळून (निर्बुद्ध कोट्या करीत) त्यांची सरबराई करण्यासाठीं अहमहमिका करीत होते पण पु. ल. नीं त्यांना तोंडघशी पाडून त्यांचे (नकली) दांत घशांत घातले.

## झालें भलतेंच

ह्या पहिल्या सलामीनें शहाणे न झालेल्या प्रकाशकांना दुसऱ्या दिवशीं आणखी एक (अनपेक्षित) धक्का बसला. 'मराठी लेखकांच्या प्रकाशकाकडून अपेक्षा' ह्या विषयावर गाडगीळ, मिरासदार, श्रीपाद जोशी व शंकर पाटील ह्यासारख्या 'चतुरस्र' लेखकांचीं (मळमळपूर्ण) वक्तव्यें ऐकायला मिळून (परस्पर) कांहीं शिष्ट व वरचढ प्रकाशकाची टापी उडवण्याची जाहीर संधी साधेल ह्या सद्हेतूनें हा उपक्रम धूर्तपणें योजिला गेला. शिवाय लेखक जर कांहीं भरकटत बोललें तर त्यांचे (श्रोत्यात) आपोआपच हंसें होईल व आपलें सोवळें (माडें) शाबूत राहून शुचिर्भूतपणाचा टिळा लावून मिरवणेंही आपोआप साधेल, पण हा एकतर्फी तोफखाना सुरूं झाल्याबरोबर प्रकाशकांचें पितळ उघडें पडत चाललेलें पाहून सुवर्णमहोत्सवी प्रकाशकांची बोबडी वळण्याची पाळी आली. थोरवीपेक्षां 'थोर' तीची ख्याति क्षणक्षणः क्षणशः वाढत चाललेली पाहून कांहीं प्रकाशकांवर कासोटा सांवरण्याची पाळी आली. कदाचित् ह्या ज्वलज्जहाल वक्तव्यांनीं म्होरक्या प्रकाशकांच्या पोटांत ढवळून आलें असावें. कारण ह्या लेखकांच्या समूहगानानंतर (पोटांत कावळे ओरडत असतानासुद्धां) कांहीं प्रकाशकांना आपलाही स्वर आणखी बेसूर (व भेसूर) आहे हें सिद्ध करण्याची इच्छा झाली. लेखकाची हस्तलिखितें (आणि त्याची प्रुफें) वाचून वाचून कमावलेल्या भाषाशैलीनें आपल्या वक्तव्याला धार आणून (बोडक्या) लेखकाची गुळगुळीत करण्याचा प्रयत्न प्रकाशकांनीं केला. पण त्यामुळें असहिष्णु भुकेलेल्या लेखकांची (विनोदबुद्धीच्या अभावीं) पोटतिडीक चाळविली गेली व सभास्थानीं पानिपत गाजण्याचा रंग दिसूं लागला. ह्या तडाखेबंद जुगलबंदीनें (व्यासपीठावरचे) प्रकाशक व (द्वारपाल) लेखक ह्याच्या कात्रींत सापडलेल्या बिचाऱ्या श्रोत्यांचे मात्र निष्कारण हाल झाले. ज्यांचें अक्षरवाङ्मय आपण वाचतों ते हे लेखक (शिष्टपणा सोडून) व ज्यांच्या उदार आश्रयामुळें मराठी साहित्याला (व लेखकांना) 'हे' दिवस दिसले ते हे प्रकाशक (कमरेचें सोडून) ऐन ग्रीष्म ऋतूंत (आणि एका शैक्षणिक संस्थेंत) भर माध्यान्हीं शिमगा साजरा करतात हें दृश्य श्रोत्यांना अनपेक्षित व धक्का देणारें होतें. ग्रामीण कथा लिहिणारे लेखक आपल्या सराईत भाषेंत व शिष्टतेचा अंगरखा घालणारे प्रकाशक (आपली 'राज'-भाषा सोडून) अभिजात ग्राम्य भाषेंत हमरीतुमरीवर येतात हा सोहळा ज्या आमंत्रित व अनाहूत श्रोत्यानीं पहिला ते खरे भाग्यवान. सफेत पोशाखाखालची काळी कातडी तीव्र तापली कीं कशी लकाकते किंवा साळिंदराला डिवचलें कीं तो आपले काटे कसे फुलवतो हें '.लिखितमपि गृहित्वा शारदा सर्वकालं तदपि तव गुणाना राज पारं न याति,' ह्या स्तोत्राप्रमाणेंच अवर्णनीय ठरेल.

## कुठें इंद्राचे ऐरावत... !

वास्तविक प्रकाशन पंचविशी साजरे केलेले चौरस बुद्धीचे थोर प्रकाशक कुणीकडे आणि कुठे हे कालचे मुजोर लेखक बच्चे ! ज्याच्या पासंगाला आपण पुरणार नाहीं त्याच्याशी संग करायची ईर्षा बाळगण्याचें धारिष्ट्य लेखकांनीं करायला नको होतें. ज्याच्या गाढाऊनमुर्ध्ये लेखकाच्या अकलेच्या लक्षावधि कवडी पुरलेल्या आहेत त्या सामर्थ्यवान प्रकाशकाच्या वाटेला ज्यांचीं दोनचारही पुस्तकें प्रकाशात आलेलीं नाहींत त्या चिमुरड्या लेखकानीं जाणें हा केवढा अतिप्रसंग ! ज्यानीं आपल्या अकलेचा सोन्याचा कळस साफसूफ करून त्याला कलेचा आकार आणि प्रकाश दिला त्याच्याशीं कृतज्ञ रहाण्याऐवजीं त्याचा जाहीरपणें धिक्कार करण्याचा मनसुबा लेखकानीं रचावा ह्यापेक्षां अधिक कृष्णकृत्य तें कोणचें ? ज्याच्या उदार आश्रयाखालीं आणि आतिथ्यामुळें पुण्यात आपली 'सोय' होऊं शकली त्याच्यावरच भरल्यापोटीं असें भुंकणें लेखकाना श्रेयस्कर वाटलें का ? ज्याच्या पिशवींत चपला आणि तोंडात गालिसहस्रनाम असूनहि जें खेळीमेळीनें आजवर आपल्याशीं नागरनीतीनें वागले त्यांच्या तंगड्या ओढून त्यांना हास्यास्पद करण्याची जानपदवृत्ति कधीं फायदेशीर ठरूं शकेल काय ! ज्यांची शालजोडी मिळाली नाहीं त्याना शालजोडीतले देणें लेखकाच्या क्षुद्र बुद्धीलाच साजिरें ठरेल. ज्यानीं आजवर गळ्यात गळा घालून आपल्याला स्नेहानें वागवलें त्याच्या चार आपुलकीच्या बोलानीं चिडून जाऊन गळा काढून रडणें व खोटा कांगावा करून शालागृह डोक्यावर घेणें हे लेखकाना शोभलें ?

## 'का घातुक रुसवा ?'

जानादो ! मराठी साहित्याच्या उदारधी प्रकाशकानीं लेखकाचे हे थिल्लर चाळे आपल्या पोटात घालून आपल्या अतिथ्यशील स्वभावानें अभ्यागत लेखकाची समजूत घालण्यासाठीं जाहीर (लेखी) माफी मागितली ह्यात त्याच्या अभिजात चांगुलपणाची प्रचीति आली. कासव ओबडधोबड व मंदगतीचे असतें अशी कोवळ्या सशानें थट्टा करून त्याच्याशीं शर्यत लावली आणि अखेरीस कासवच कसा विजेता ठरला हें ईसापकथेचें सार प्रस्तुत प्रसंगी अक्षरशः प्रत्ययास आलें आहे.

प्रस्तुत उपक्रमानें 'मराठी प्रकाशकाच्या लेखकांकडून अपेक्षा' कोणत्या नसतात हे सिद्ध झाल्यामुळे 'मराठी ग्रंथप्रकाशक सभे'चा यंदाचा वार्षिक सोहळा अपेक्षिल्याप्रमाणें कांहीं अंशीं तरी फलद्रूप झाला असें म्हणावें लागेल. उदरधी प्रकाशकानीं लेखकाच्या उपद्रवी बाललीलाकडे ज्या क्षमाशील वृत्तीनें पाहिलें त्यामुळें समझोता झाला हें ठीकच झालें. नाहींतर तोंडात मारून घेऊन नाकदुऱ्या काढत ह्याच प्रकाशकाकडे जाण्याची पाळी आश्रयार्थी लेखकाना अपरिहार्य ठरणार मग हा रुसवा कशाला ?






## कल्पक पुणेकर

मे महिन्यांतल्या वृत्तपत्रांत अनेक सनसनाटी बातम्या प्रसिद्ध झाल्या होत्या. त्यांत कृष्णा-गोदेचें पाणी, भारत-पाकिस्तानच्या संयुक्त बैठकी आणि साखरेच्या दुर्भिक्षाच्या बातम्या जवळजवळ मुखपृष्ठावरची तीन चतुर्थांश जागा दररोज ठळकपणें व्यापून वाचकांना बदलत्या विश्वाची कटु जाणीव करून देत होत्या ह्यापैकीं कृष्णा–गोदच्या पाण्याच्या प्रश्नानें फक्त आसमंतांतल्या लोकांच्याच तोंडचें पाणी पळालें होतें. इतर प्रांताचे लोक ह्या वधघटीच्या पेंचप्रसंगानें जरा सुद्धां हवालदील झालेले नव्हते. भारत–पाकिस्तानच्या प्रतिनिधी मंडळाच्या कूर्मगतीनें चालणाऱ्या चर्चा ह्या देशव्यापी राजकारणाच्या उच्चपातळीवरच्या असल्यामुळें स्थानिक पत्रप्रतिनिधी, काश्मीरचे अधिकृत पुढारी आणि पाकिस्तानचे संधिसाधु नेते ह्याशिवाय कुणाला ह्या हालचालींचे सोयरसुतक वाटत नव्हतें. अखेरच्या बैठकींत भूतो रागावून गेले असले तरी ह्या प्रकरणीं भावी काळांत ‘ न भूतो न भविष्यति ’ असं वाटून काळजी करण्यासारखें कांहीं घडेल असेंहि कुणाला वाटलें नाहीं. भारतांतल्या बहुसंख्य जनतेला भेडसावणारा या महिन्यांतला यक्षप्रश्न म्हणजे अन्नधान्याचें दुर्भिक्ष, गेल्या महिन्यांत महाराष्ट्रांत प्रथम साखर, नंतर गूळ, तांदूळ, गहूं, रॉकेल (आणि आंबे) इत्यादि आवश्यक वस्तूंच्या झालेल्या टंचाईमुळें सामान्य माणसांचें सुखवस्तु जीवन उखडून निघालें होतें. मुंबईच्या जनतेनें हें सर्व कमीअधिक प्रमाणांत सहन केलें तरी त्याची आणखी परीक्षा पहाण्यासाठीं कीं काय नळाचें पाणीही तोडून टाकलें. जनता ह्या सर्व आपत्तीनें विंवचनेंत पडली होती तेव्हां राज्यकर्ते (व कर्ते) उन्हाळ्याची झळ जास्त जाणवल्यामुळें थंड हवेच्या ठिकाणीं अगर राजधानीपासून शक्य तितक्या दूरदूर दौऱ्याच्या निमित्तानें फिरत होते. मुंबईच्या महानगरपालिकेंत (आयत्या वेळची करमणूक म्हणून) पुरवठा मंत्र्यांच्या उपेक्षावृत्तीवर जळजळीत चर्चा होऊन अविश्वास आणि राजिनाम्याच्या मागणीपर्यंत तणातणी झाली. तरी सुद्धां एकंदरींत महाराष्ट्राच्या ह्या पश्चिम आघाडीवर अद्यापीहि सामसूमच आहे.

मे महिना हा वासंतिक ऋतूचा सोहळा साजरा करण्याचा उत्सवकाल ह्या काळांत पुण्यामुंबईंत लग्नाच्या आमंत्रणांचा अक्षरशः पाऊस पडतो. अनेक मुकन्या अनपेक्षितपणें उजवल्या जातात, वाजंत्री कंत्राटदारांना लाभयोग घडतो. हॉलची भाडीं वाढतात आणि रस्त्यापर्यंत जेवणावळी पोचतात. पुण्यांतल्या भिकाऱ्यांना आणि चोरांना हा काळ बरकतीचा वाटतो. म्हणून ह्या सीझनमध्यें पुण्यांत त्यांची आयात वाढते असें संख्याशास्त्रज्ञ सांगतात.

पण यंदा हा गोड मोसम तिखटच ठरला. पानशेतच्या पाणलोटानंतर पुणेकरांचें पुनर्वसन होतें न होतें तो गणेशखिंडीच्या वीजघरांत स्फोट झाले आणि त्याचा परिणाम म्हणजे दिवसा दिवे लावणाऱ्या पुणेकरांना रात्रींबेरात्रीं अंधारांत वावरावें लागलें. वीज येण्यापूर्वी म्युनिसिपालिटीच्या लामण दिव्यांत पुणेकर जनता सरावानें वावरून दिवाभीत प्रतिपक्ष्याच्या डोळ्यांत बोटें खुपसत असे सांगतात ह्यावेळीं अनेक पक्ष [ व पक्षी ] ह्या मोसमांत पुण्यांत घरठाव करून राहिले होते त्यांचा कांटा काढण्याची पुरेपूर संधी ह्या विद्युल्लतेच्या आँखमिचौलीनें पुणेकरांना दिली. त्रस्त वधुपित्याच्या कुणा महात्म्यानें अंधाराचा फायदा घेऊन प्रतिपक्षी व्याह्याची झिरमिळी पगडी अंधाराचा डाव साधून उडवून तुडवून दिली तर एका विहिणीनें काळोखांत (मुद्दामच) दुसऱ्या पसरलेल्या विहिणीच्या पायावर पाय देऊन तिला जायबंदी केलें. अशा अनेक बातम्या लकडीपुलाच्या आसपास रसभरितपणें चर्चिल्या जात होत्या. एका लग्नांत तर ऐन घटकेला दिवे गेल्यामुळें नवऱ्याच्या हातांतल्या नव्या रेडियमच्या घड्याळाच्या उजेडांत माळा घालाव्या लागल्या तर दुसरीकडे ऐन पंगतींतलें लाडू व दक्षणेचे नये पैसे अंधाराचा फायदा घेऊन लांबवल्याची ‘ कम्प्लेन्ट ’ गेटावर नोंदल्याचीहि बातमी आहे.

पुण्याच्या ह्या मोसमांत पानशेतच्या पुरामुळें पळाले पाण्याचें दुर्भिक्ष फारच जाणवलें. लग्नघरांत पाण्याऐवजीं शीतपेयांचे पेले वाटण्यांत आले व कुण्या एका नवरदेवानें ‘किस्मत’नें चुळ भरून सोड्यानें स्नान करण्याची हौसही भागवून घेतली. सरकारी खटपटीनें पुण्याच्या कांहीं भागांतल्या नळांना पाझर फुटत होता पण वऱ्हाड्यांच्या आयातीमुळें ह्या नळांचीं आर्जवें करणाऱ्या गृहिणी अक्षरशः दमयंती झाल्या, बाकी पुणेकरांची वृत्ति खरी स्थितप्रज्ञ. कुठल्याही प्रसंगाला ‘ तोंड ’ देण्याची त्याची ख्याति आंतरराष्ट्रीय. असल्या अडचणीच्या अंधाऱ्या गल्लीबोळांतही त्यांनीं मार्ग काढला. पाणी नाहीं तर पेय पाजलें, साखर नाहीं तर सुंठ वाटली. श्रीखंड नाहीं तर त्रिखंड काढलें, आईसक्रीमऐवजीं रसवंती अवतरली, मधुमेह पीडितांसासाठीं केलेली सॅकरीनची मिठाई इतरांना वाटून उत्सव साजरा केला, चहा–कॉफी ऐवजीं (बिनसाखरेचा) कोको, बोर्नव्हिटा व आंबट पन्हें आणि मोतीचूर व जिलब्यांऐवजीं मसालेभात व मठ्ठा वाटून मेहुण परतवण्याच्या अनेक क्लृप्त्या निघाल्या देव कोपला तरी पुणेकर परीक्षेला उतरले आणि वऱ्हाडी कुरकुरला तरी ह्या मोसमांतही विवाह गजबजले धन्य धन्य पुणेकर आणि त्यांची ती व्यवहारचतुर कल्पकता !

---

## झोपी गेलेला जागा केला

भारताच्या स्वातंत्र्यप्राप्तीनंतर राज्यकर्त्यांवर अनेक राष्ट्रव्यापी समस्यांचा ताण पडल्यामुळें तनमनधनेंकरून त्यांना शीण आला आहे. प्रांतीय राजकारणांत जनतेची अज्ञता, आलस्य आणि दारिद्य ह्या प्रगतीच्या आड येणाऱ्या तिहेरी अडचणीमुळें मंत्री, पुढारी आणि राजकारणी ह्यांचे सूत अलिकडे जमेनासें झालें आहे. दिल्लीकर तर डोकें शांत ठेवण्यासाठीं शीतवात संचलन, दिम्मती पेयें, झुळझुळित वस्त्रें आणि चंदनी मुखराग वापरून काळ कसातरसा कंठत असतात. बिचारे मंत्री !

राष्ट्राचा एवढा भरिमार उचलतात पण त्यांच्या कर्तृत्वापेक्षां त्यांच्या सुखासीन वृत्तीचीच विरोधी पक्ष पार्लमेंटांत राळ उडवितो. ऑडिटरजनरलला तरी ह्या मंत्र्यांच्या राजेशाही निवासस्थानावर छिद्रान्वेषी काकदृष्टि ठेवण्याचा नसता उपद्व्याप करण्यास कोणी सांगितलें होतें ? मंत्री हे पुरुषवर आहेत. त्यांनीं भारतीय जनतेसारखें दरिद्री जीवन कंठावें असा तरी कुणी आग्रह कां धरावा ? तसें जर त्यांनी केलें तर त्यांचा उच्च दर्जा आणि बरचष्मा कसा टिकून राहील ? पण






लोकशाही आणि समाजवादाच्या खुळ्या कल्पना अवास्तव ताणण्याची भारतीय पक्ष-नेत्यांची क्षुद्र वृत्ति ह्याबाबतींत तरी अप्रस्तुत मानून वेळींच ती गाडून टाकली पाहिजे नाहींतर पुढल्या निवडणुकींत ह्या टीकास्त्रा-मुळें मंत्रिमंडळ ओस पडण्याचा संभव आहे. अंकलेश्वरच्या तलखाणीच्या समारंभांत नेहरूंचें भाषण चालू असतां गुजरात राज्याचे मुख्य-मंत्री डॉ. जिवराज मेहता हे अमंळसे झोपीं गेले व नेहरूंचें लक्ष जातांच त्यांनीं त्यांना बखोटीला धरून हलवून जागें केलें. ही बातमी गेल्या महिन्यांत वृत्तपत्रांत चविष्ट वृत्तीनें प्रसृत झाली आणि ह्या क्षुल्लक प्रसंगाचा निष्कारण बोलबाला झाला. अंकलेश्वरचा उन्हाळा, श्रोत्यांचें उतार वय आणि नेहरूंचें कंटाळवाणें भाषण ह्या तिघांचा सामुदायिक परिणाम होऊन कुणाहि निरोगी माणसाची तीच गत झाली असती. मग जिवराजांचा एवढा गाजावाजा कशासाठीं ? मुख्यमंत्री झाला म्हणून त्याला कांहीं देहधर्मापासून मुक्ति मिळत नसते. तशांत राज्यकारभाराच्या शिणामुळें त्यांना रात्रीं झोप लागत नाहीं. मग दिवसा त्यांनीं डुलकी काढली तर त्यांत काय गैर झालें ? वामकुक्षीच सेवन निरामय जीवनासाठीं किती आवश्यक आहे ह्याचा आयुर्वेदानेही हिरीरीनें पुरस्कार केला आहे. एवढ्या सुधारलेल्या ब्रिटनचा चर्चिल भर पार्लमेंटच्या बैठकींतही डुलक्या काढतो आणि त्यांचें जगभर कौतुक होतें मग अंकलेश्वराच्या समारंभांत गुजराथचे मुख्य-मंत्री झोपी गेले तर त्यांचा एवढा दुस्वास कां ?

## जादूचे प्रयोग

अमेरिकेंतील सुप्रसिद्ध जादुगार जॉन काल्वर्ट यांनीं मे महिन्यांत मुंबईत जादूचे प्रयोग करून प्रेक्षकांना थक्क केलें अशी बातमी आहे. एका सीलबंद पेटींत दोन दिवसानंतर येणारे न्यूयॉर्क कॉटनचे आंकडे व वृत्तपत्रांचीं शीर्षकें त्यांनीं लिहून ती पेटी महापौरांच्या स्वाधीन केली व दोन दिवसांनीं प्रेक्षकांच्या समोर ती उघडून ती तंतोतंत असल्याचा चमत्कार करून दाखविला. ह्याशिवाय डोळे बांधून चौपाटी ते नरिमन पॉइंट व तसेंच परत या मार्गानें त्यांनीं मोटार लॉंच फिरवून दाखविली असेंही म्हणतात. वास्तविक ह्या दोन्ही प्रयोगांत अभिनवता किंवा जादू काय आहे आणि ह्या अमेरिकन जादूगाराचें एवढें कां कौतुक केलें गेलें ह्याचेंच आश्चर्य वाटतें. मुंबईकरांना तरी असल्या जादूच्या प्रयोगांचें नाविन्य वाटूं नये. एस. एस. सी. बोर्डाचे अधिकारी प्रतिवर्षी अनेक पासांचें नापास व नापासांचे पास किती सहजगत्या व सरावानें करतात हें वृत्त आपण वाचतों. 'रोज मरे त्याला कोण रडे' ह्या न्यायानें ही बोर्डाची जादू आपणास उल्लेखनीय वाटत नाहीं आणि आतां तिचें आपण कौतुकही करत नाहीं ह्या व विद्यापीठाच्या परीक्षांच्या प्रश्नपत्रिका किती तरी विद्यार्थी अक्षरशः उकलून दाखवतात, त्यांच्या ह्या चमत्कारांचें आपण कौतुक करत नाहीं. यंदाच्या इंटरच्या परीक्षेस बसलेल्या मुंबईच्या एका महाविद्यालयाच्या विद्यार्थ्यांना तर्कशास्त्राचीं प्रमेयें परीक्षेपूर्वी कित्येक दिवस अवगत झालीं होती व प्रश्न-पत्रिका पाहिल्याबरोबर तीं तंतोतंत बरोबर होतीं हें सिद्ध झालें पण परीक्षेच्या परिणामांत फक्त ते पसार झाल्याबद्दलच्या त्यांच्या नामनिर्देशा-पलिकडे त्यांच्या ह्या अंतर्ज्ञानाचें कुणी कौतुक केलें नाहीं. न्यूयॉर्क कॉटनचे आंकडे आमचा कोणताही पानवाला अचूक सांगतो त्याची कुणी दखल घेत नाहीं. साखरेचें रेशनिंग होण्यापूर्वी कित्येक दिवस (खुद्द मंत्र्यांआधीही कदाचित्) साखर व्यापाऱ्यांनीं दुकानांत 'साखर–गूळ नाहीं' असे फळक लिहून तयार ठेवले होते. त्यांची दिव्यदृष्टि कुणालाही चमत्कृ-तिजन्य वाटली नाहीं. मुंबईच्या चिराबाजारांत काळबादेवीवर, भुलेश्वरला आणि घोडबंदर रोडवर अनेक टॅक्सी व बसड्रायव्हर डोळे मिटून कौशल्यानें वहानें चालवितात पण त्यांची दखल पोलिसच फक्त घेतात आणि ती सुद्धां जादू संपल्यावर कालांतरानें ! ह्या सर्व चमत्कारांचा परिचय मुंबईकरांना हरघडी होत असतांना स्वकीयांना अनुल्लेखानें मारून कुणा अमेरिकन जॉन कल्वर्टचें आपण तोंडभरून कौतुक करूं शकतों यावरून गोऱ्या कातडीचें आकर्षण व एतद्देशीय तोंडपुजेपणा स्वातंत्र्या-नंतर अवापही आपण राबवूं पहातों हें निःसंशय गुलामगिरीचें व लाचारीचें लक्षण आहे.

## जरि गुरु झाला भ्रष्ट

विद्यार्थ्यांच्या बुद्धीचा विकास होण्याच्या दृष्टीनें आदर्श अशी परिस्थिती निर्माण कर-ण्याच्या कामीं भारतीय विद्यापीठांना अपयश आलें आहे असें मत नॅशनल कौन्सिल ऑफ युनिव्हर्सिटी स्टुडण्ट्स ह्या संस्थेनें अलिकडे प्रदर्शित केलें आहे. विद्यार्थी संघटनांच्या प्रति-निधींनीं निरनिराळ्या विद्यापीठांतील प्रचलित परिस्थितीची पाहणी केल्यानंतर असा निष्कर्ष काढला आहे कीं स्वातंत्र्योत्तर काळांत शिक्ष-कांचा दर्जा खालावला आहे व शिक्षक आपल्या कर्तव्याकडे दुर्लक्ष करूं लागले आहेत. आपल्या पेशाला किती स्वार्थत्याग करावा लागतो व त्यासाटीं आपल्या वेतनाचें प्रमाण वाढवून मिळावे ह्यासाठीं विद्यापीठाच्या सभांत वेळोवेळीं ठराव मांडून ते पास करून घेण्या-पलिकडे शिक्षकांना शिक्षणाबद्दल आणखी कांहीं आस्था वाटत नाहीं असेंही ह्या पाहणींत दिसून आलें आहे. विद्यार्थी बेशिस्त वागतात, त्यांना गुरुजनांबद्दल आदर नाहीं कीं शिक्षणा-बद्दल प्रेम नाहीं अशी ओरड हे शिक्षक वारंवार करीत असतात व अशा रीतीनें 'चोराच्या उलट्या बोंबा' मारून आपल्या अनास्थेचें खापर विद्यार्थ्यांच्या डोक्यावर फोडण्या-साठीं शिक्षण संधी सोडत नाहींत. पुणें विद्यापीठांतील राज्यशास्त्राचे अध्यापक श्री. शिर्सीकर ह्यांनीं पदव्युत्तर विद्यार्थ्यांच्या पाह-णीचा एक तपशीलवार अहवाल कांहीं महिन्या-पूर्वी प्रसिद्ध केला त्यावरून ह्या विद्यार्थ्यांच्या मनांत आपल्या मातृसंस्थेबद्दल किती अनादर वसत आहे ह्याची जाणीव होते. महाविद्यालयां-तल्या प्रवेशापासून तो विद्यापीठाच्या परीक्षां-पर्यंत प्रत्येक खात्यांत व बाबतींत कसा भ्रष्टाचार चालत असतो ह्याची तक्रार ह्या विद्यार्थ्यांनीं आपल्या मुलाखतींत परखडपणें सांगितलेली आढळते. ह्याशिवाय विद्यापीठांतील कर्मचारी, प्राध्यापक, अधिकारी व ग्रंथपाल आपणाशीं उद्धटपणानें वागतात अशीही त्यांची तक्रार आहे. आजकालचे विद्यार्थी फारच फाजील व आपली पायरी सोडून कसें वागतात त्याचा प्रस्तुत अहवाल हा एक अपूर्व नमुना ठरेल. करवीर पीठाचें जगद्गुरु शंकराचार्य ह्यांनीं 'अनालस्यं ब्रह्मचर्यं शीलं गुरुजनादरः स्वावलम्बो दृढाभ्यासः षडे ते छात्रसद्गुणाः !' ह्या श्लोकांत आदर्श विद्यार्थ्यांचे आदर्शांचे महागुण वर्णिले आहेत. शाळांत व कॉलेजांत ठळकपणें ह्या श्लोकांचा फलक लावलेला आढळतो पण तो नुसता वाचण्याची तसदीसुद्धां विद्यार्थी घेत नाहीत तिथें त्याचा अर्थ लावून त्याप्रमाणें आचरण करणारे विद्यार्थी अपवादात्मकच निघतील. प्राध्यापकांवर ताशेरे ओढणारे विद्यार्थी

...पान ५४ वर



## स्वस्तिक पर्फ्यूमड् कॅस्टर ऑईलनें

तुमचे केस रेशमासारखे मऊ आणि सुंदर रहातात.

**स्वस्तिक केशरचनाशैलि 'कल्पना'**

आपला केशभार डाव्या हातानें मानेच्या वर उचलून उजव्या हाताचा तळवा डाव्या हातावर ठेवा अन् उजव्या हाताच्या तळव्यावरून केस लपेटून पीन नीट लावा. राहिलेला केशभार असाच डावीकडून उजवीकडे लपेटून घ्या अन् त्यांच्या टोंकाचा भाग लपेटीखालीं दुमडून टाका.



**स्वस्तिक** ऑईल मिल्स लि., मुंबई

# तुमच्या केशसौंदर्यासाठीं नवें गुणगान




अनुक्रमणिका

